


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# दीपावली

गणराज्य दिन
विशेषांक

फेब्रुवारी '७१

वर्ष २६ वें

मूल्य २ रु.

अनुक्रमणिका








संस्थापक
कै. दीनानाथ दलाल

## ग ण रा ज्य दि न वि शे षां क

फेब्रुवारी १९७१ • वर्ष २६ वे • मूल्य २ रु.

## श्रे य ना मा व ळी

▲ धुंद मैफल सरली ... कै. दलाल यांना श्रद्धांजली ▲ प्रेरणा ... वळीयाचा अंगसंग ... आकृतीतंत्राला दिलेला आकार ( लेखांक दुसरा ) .... **चित्रकार द. ग. गोडसे** ▲ दहा लाखाची चित्रकथा आणि सत्यकथा .... भडक रंगाने रंगलेले प्रकरण .... **ना. व्यं. देशपांडे** ▲ शेपूट तुटलेला, उंदीर .... साहेबाकडून रजा मिळविण्याची युक्ती .... **यशवंद गोडबोले** ▲ नटश्रेष्ठाची अनुभव-गाथा .... नाटचसृष्टीत प्रथम प्रवेश कसा झाला .... शब्दांकन **लक्ष्मीदास बोरकर** ▲ मी कुणाला मत देऊ ? .... परिसंवाद ... **दि. वि. गोखले, स. ह. देशपांडे व सारस्वत** आणि

| | | |
|---|---|---|
| **हरवलेला** | लेखक | **नवी** |
| **मधुचंद्र** | **प्रभाकर पेंढारकर** | **कादंबरी** |

तसेच

**✱ मासिक बिंगचित्रमाला ✱**








संपादक – मुद्रक – प्रकाशक – मालक : सुमती दी. दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत २ रु. + रजि. पोस्ट १ रु. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay-4.







अनुक्रमणिका

कै. दीनानाथ दलाल : जन्म–३० मे १९१६ • मृत्यु–१५ जानेवारी १९७१

आसवे डोळ्यात माझ्या, शब्द ओठी थरथरे
कल्पना 'विरही' मनाची, अंगी भरवी कापरे

– तुझीच 'दीपावली'

अनुक्रमणिका

# धुंद मैफल सरली, सूर रेंगाळतच राहतील

एक धुंद मैफल सरली—दरबार बरखास्त झाला—तंबोऱ्याची तार अचानक तुटली. बैठकीचा बादशहा दाद मागता मागता आणि दाद देता देता अचानक, मूकपणे उठून निघून गेला. बशीतले रंग सुकून गेले आणि कॅन्व्हासवरल्या आकृती हुंदके देत आक्रोशू लागल्या. शृंगारसखींच्या पायातील पैंजण गळून पडले आणि त्यांच्या पायात जणु मणामणांच्या बेड्या पडल्या. कविता मूक झाल्या आणि शब्द आपली कळा (आणि कलाही) गमावून बसले. फोन सारखे खणखणले पण पलिकडे उत्तर देणाराच उरला नव्हता. ती द्रौपदी, सीता, शकुंतला, मालती साऱ्या साऱ्या पुन्हा एकदा जमल्या आणि म्हणाल्या "आम्हाला सजीव करणाऱ्या जादूगारा, आम्हाला रंग दिलेस, रूप दिलेस, आकार-विकार दिलेस आणि शब्द देण्यापूर्वीच तू असा मूक का रे झालास? तुझ्या हातच्या कुंचल्यात वाणीचे सामर्थ्य आहे राजा! बोल आणि आम्हालाही बोलते कर" त्या मूक विनवणी करीत राहिल्या. पण खुर्ची हलली नाही. बाजूचा दिवा वाकला नाही की पेटला नाही. प्रकाशाने मेज झळाळून गेले नाही. रंगांची पेटी बंदच राहिली. ब्रश हलले नाहीत. रंगांनी आपली रंगकळा धारण केलीच नाही. मेघाबरोबर प्रीति-संदेश पाठविणारा अमर यक्ष त्या खुर्चीत पुन्हा स्थिरावलाच नाही. खुर्ची रिकामीच राहिली.

खुर्ची रिकामीच राहिली.

खुर्ची रिकामीच राहील.

रंगदरबारातील अनभिषिक्त सम्राटा, खरंच सांगतो, तुझी खुर्ची रिकामी झाली. सदाची ती रिकामीच राहील. मैफलीच्या रसिकराजा, तिथे माणसे येतील. त्या रिकाम्या खुर्चीकडे तासन् तास पहात बसतील पण ती खुर्ची आता कधी हलणार नाही, बोलणार नाही. हसणार नाही, रुसणार नाही. रागावणार नाही आणि कडाडणारही नाही. खूष होऊन टाळी देण्यासाठी वाकणार वा पुढे सरकणार नाही. त्या खुर्चीने अनेक उन्हाळे पावसाळे सर्वार्थाने पाहिले. पण ती कधी थरथरली नाही. कापली नाही, वाकली नाही. न पटणाऱ्या तडजोडी तिने कधी केल्या नाहीत. पण जे जे पटले ते ते मोठे कसे होईल, अमर कसे होईल, सुंदर व रुचिरतर कसे होईल यासाठी मात्र ती खुर्ची सतत हलत राहिली, बोलत राहिली. तीत बसणारा कलासक्त, जीवननिष्ठ आणि सौंदर्यनिष्ठ योगी त्या महानतेसाठी व सुंदरतेसाठी सतत धडपडतच राहिला. त्याला जशी रंगांची किमया साधली होती, वस्तुवस्तूतले, मानवी विभ्रमातले सौंदर्य जसे त्याच्याशी बोलू शकत होते तसेच विशाल जीवनानुभवही शब्दांच्या माध्यमातून त्याचेकडे चालत येत असत. त्या शब्दकळेतल्या अनुभवांची खोली, सच्चाई, व्यापकता तो जाणू शकत होता. तो भाविक होता, पण भाबडा नव्हता. त्याला व्यवहार कळत होता. पण व्यवहारापेक्षाही माणूस मोठा आहे, आयुष्य मोठे आहे, कला मोठ्या आहेत, ह्याची त्याला जाण होती. आणि सारे कलात्मक सौंदर्यानुभव हे व्यवहाराच्या अतीत जाऊन घेण्याची ताकद, जिद्द व शैशवी कुतुहल त्याचेजवळ होते—अखेर तोही एक माणूस होता. पण माणसाला जीवनाचा अर्थ कळला, वस्तुजाततली सुंदरता कळली, माणसाच्या मनातल्या ध्यास-भासांची व स्वप्नांची महत्तमता कळली तरच माणसाचे जीवन तेजाळून निघते. सामान्यतेतून असामान्यत्वाचे वेड लागते व त्या वेडाचा वेध घेत घेत एक सामान्य जीवन सम्राटपदाकडे झेपावत जाते. कलेच्या, क्रीडेच्या, जीवनाच्या विविध क्षेत्रात महत्तमाचा वारसा ठेवणाऱ्या माणसांना अशीच काही वेडे असावी लागतात—त्यांचा ध्यास जडावा





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४

**टेलिफोन :** ३५७७६५ ★ **तारेचा पत्ता** DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५; द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०.

● **वर्गणी मनिऑर्डरने द्यावी.** चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवायचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातीचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल. साहित्य गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाही.

संस्थापक : कै. दीनानाथ दलाल

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : **सुमती दी. दलाल यांनी अशोक प्रिंटींग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.**









लागतो. तरच किमया घडते. दिव्यत्व साकारते. आणि मग एखाद्या दिव्य क्षणी कुणी तरी कवी म्हणून जातो--

दिव्यत्वाची जेथ प्रचीती
तेथे कर माझे जुळती

त्या रिकाम्या झालेल्या आणि रिकाम्याच राहणाऱ्या खुर्चीपुढे नत होऊन आम्हीही तेच म्हणालो, तेच म्हणत राहू. गणपतराव जोशी पुन्हा होणे नाहीत, बालगंधर्व पुन्हा होणे नाही. अब्दुल करीम खाँ यांचे दर्शन पुन्हा अशक्य, सावरकर पुन्हा दिसणे अशक्य, नेहरू, गांधी, राजेंद्र प्रसाद, केळकर, वामनराव जोशी, माधव ज्युलिअन, आचार्य अत्रे, दीनानाथ आणि नरेश, सवाई गंधर्व आणि विलायत हुसेन खाँसारख्या कलासम्राटांचे दर्शन पुन्हा होणार नाही. तसेच दीनानाथ दलाल ह्या नावाने ओळखला गेलेला आधुनिक रविवर्मा, चित्रकलेतील उमरखय्याम व अमरखय्याम पुन्हा सशरीर होऊन त्या खुर्चीत स्थिरावलेला दिसणार नाही . . . ती खुर्ची रिकामी झाली सदाची रिकामी राहिली.

जे सतत फुलत, बहरत होते ते उन्मळून पडले. जे सतत प्रयोग-प्रयत्नशील होते तेच गळून पडले. नव्याचा, उत्तमाचा, महत्तमाचा वेध घेणारे ते शोधक, बोलके डोळे कायमचे मिटले. ते शालीन, मनस्वी कलाधुंद व्यक्तित्व मूक झाले. प्रसिद्धीला नेहमीच विरोध करणारे, मानसन्मान, भेटी, गौरव नाकारणारे दिलदार, दिलचस्प, कलारत व सतत कार्यरत राहण्यातच धर्मपालन मानणारे एक श्रद्धाळू व्यक्तित्व अखेर कसलाही गाजावाजा न करता, कुणाचाही जाहीर वा खाजगी निरोप न घेता काळाच्या दरबारात निघून गेले. "असा निरोप घ्यायचा होता म्हणून का रे ती रजत रजनी नटली, नटवलीस?" असा अस्वस्थ करणारा प्रश्न साऱ्यांच्या चेहऱ्यावर दिसतो आहे. प्रकृती बरी नसतानाही स्टुडियोच्या पायऱ्या चढण्याची खरंच गरज होती? राहिलेला फॉर्म आम्ही नसता का केला? आम्हाला फोनवर नाही का कळवायचं?"

नुसते प्रश्नच प्रश्न!
उत्तरं नाहीतच.
कारण खुर्ची रिकामी झाली आहे.
रिकामीच राहील.

काम, सतत काम, मूकपणे काम, आणि आपल्याला समाधान लाभले नाही तर स्केचेस बाजूला टाकून देण्याचीही तयारी--चुकारपणा नाही. कुणाचीही लुडबुड चालायची नाही. न पटलेले कधी आग्रहाला बळी पडून स्वीकारणे नाही तसेच जे पटले त्याला कुणाचा विरोध आहे म्हणून नाकारणे नाही. कानही हलके नव्हते. मनही हलके नव्हते म्हणूनच भिन्न प्रकृतीची माणसे त्या दरबारात रमत, रंगत असत. तिथे नुसत्या चर्चा होत नसत तर वादविवादही होत असत. दोन ध्रुवावरची माणसेही ह्या ध्रुवाभोवती फिरू शकत असत. इथे नाटकही 'बोलून' जात असे तसेच एखादी तान घेत येणारा भोवे वा जितेंद्रही सूर रेंगाळत ठेवून जात असे. इथे रंग जसे बोलत असत तसेच एखादी सुरेल व रंगेल कथाही शब्दकळा धारण करू शकत असे. इथे एखादी कविता सोपानदेव ऐकवीत तर एखादा नवकवी केस-दाढी पिंजारीत येई आणि आपलाही झेंडा रोवून जाई. पण हे सारे चालू असतानाही कुंचला कार्यरतच असे. ते रंग, तो कुंचला, ती रंगांनी भरलेली बशी, तुम्ही अर्धवट पूर्ण केलेली ती मुखपृष्ठांची स्केचेस, टेबलावरची ती दौते, भिंतीवरची ती किमयागारी--

सारं सारं टाकून तुम्ही निघून गेलात. अजून कितीतरी गोष्टी व्हायच्या होत्या. ठरवायच्या होत्या. 'लंडन विशेषांका'ची सुरेख व आगळी भेट तुमच्या वाचकांना फार फार आवडली हे तुम्हाला सांगायचं होतं. 'रजत महोत्सवी रजनी'च्या वृत्ताने अंक सजवायचा होता--वर्षारंभ अंकाची योजना आखायची होती, नवीन लेखकांची यादी करायची होती. चित्रपट अंकाची संकल्पना करायची होती--

सारे संकल्प विरले. तुम्हीच दरबारातून उठून गेलात. आम्ही दाद कुणाजवळ मागायची? टाळी देणार कोण? खळाळून हसत 'उत्तम!' असं म्हणणार कोण? वय विसरायला लावणारी किमया जवळ असणाऱ्या कलाकारा, मैफल पुन्हा सुरेख जमू लागली होती तोच तूच उठून गेलास. 'रजत रजनी'ने अनेकांना नवा प्रकाश दिसला असताना तूच असा अंधारात गडप झालास! प्रसिद्धी नको होती हे खरं, पण म्हणून असं मुकाटयाने उठून जायचं? मैफलीतल्या कुणालाच न सांगता? मैफलीतल्या, घरातल्या कुणाकुणालाच हे खरं वाटत नाही. खरं तर नाहीच वाटत! ढोल डिंडिम आवडत नसत हे खरं असलं तरीही असं मुकाटयाने उठून जाणं--

## श्रद्धांजली विशेषांक

'दीपावली'चे सर्वस्व असलेले श्री. दीनानाथ दा. दलाल यांचे शुक्रवार दि. १५ जानेवारी १९७१ रोजी आकस्मिक निधन झाले. त्यांच्या निकटवर्ती स्नेह्यांनी आपल्या भावना व्यक्त करण्यासाठी 'श्रद्धांजली अर्पण करण्याचे ठरविले असून मार्च १९७१ चा अंक हा 'श्रद्धांजली विशेषांक' म्हणून प्रसिद्ध करण्याचे ठरविले आहे. त्या अंकासाठीचा मजकूर अगदी थोडक्यात असावा आणि तो दि. १० फेब्रुवारी १९७१ पूर्वी 'दीपावली' कार्यालयात मिळेल अशा बेताने पाठवावा.

--संपादक.

हे तुलाच शोभतं रसिकराजा, तू म्हणूनच हे करू शकलास. विष पचवून अमृताची सृष्टीवर बरसात करू शकणाऱ्या नीलकण्ठा—तुलाच हे साधू शकलं. मनातला कल्लोळ लपवून हसत, हसवीत ठेवणाऱ्या बैठकीच्या बादशहा, तुलाच हे जमू शकलं. पण तरीही मन आक्रोशून उठतंच. रोमरोम थरथरतोच! मन उदास होतच. त्या रिकाम्या खुर्चीकडे तासन् तास पहात बसावसं वाटतं. वाटतं ती पुन्हा 'अनुभव' सांगायला उठेल. टाळी मागेल व देईलही. पण भाव्यांचे दलालशेठ पुन्हा त्या खुर्चीत दिसणार नाहीत. आम्हा साऱ्यांचे लाडके 'साहेब' पुन्हा त्या खुर्चीत बसणार नाहीत. ठाकऱ्यांचे उमरखय्याम आणि सोपानदेवांचे रविवर्मा 'शालीन भारतीयत्व' साकार करण्यासाठी पुन्हा आकार घेणार नाहीत. हजारो मुखपृष्ठांवरल्या आकृती मुजरा करायला येतील, पण—

ती खुर्ची रिकामी झालीय्.



ती पुन्हा कधी कधी भरणार नाही.
एक धुंद मैफल सरलीय्!

एक खानदानी दरबार बरखास्त झालाय्! बैठकीचा बादशहा आकाशातली खपुष्पे खुडण्यासाठी निघून गेला आहे.

त्या रिकाम्या खुर्चीकडे पहात असतानाच ओठी शब्द येताहेत—

दिव्यत्वाची जेथ प्रचीती
तेथे कर माझे जुळती

तुम्ही असताना तुमच्याबद्दल कधी काही लिहू दिलं नाहीत. भावना मूकच राहिल्या. त्यांना असं बोलावं लागतय् याची खंत उरी जाळते आहे.

तरीही—

हा 'दीपावली'चा मानाचा मुजरा मानून घ्या! तुमचे स्वप्न—ध्यास जपण्यासाठी 'दीपावली' सदा टवटवीत राहील!! 'शांती लाभो' असंच म्हणतो. ती लाभणार नाही हयाची खात्री असताना! कलावंताची अतृप्ती तुमच्याजवळ होती हे मला ठाऊक आहे.

त्या अतृप्तीनेच 'दीपावली' फुलत राहील. दिवे तेवत राहतील—सूर गातच राहतील—तुमच्या यशाचे गीत!!

—प्रभाकर अत्रे










## मी कुणाला मत देऊ?

परिसंवाद

# आगामी निवडणुकीत कोण यशस्वी होईल?

राष्ट्रपती गिरी यांच्या निवडणुकी-पासून सरकार प्रमुख इंदिरा गांधींनी, कॉंग्रेस पक्षाचेही नेतृत्व स्वतःच्या हाती घेण्याचे ठरविले आणि काही साहसी व निर्धारयुक्त पावले टाकून त्यांनी त्या-बाबतीत अल्पावधीत आश्चर्यकारक यश मिळविलं. कॉंग्रेसमध्ये नेतृत्वाची मक्ते-दारी निर्माण करून बसलेल्या वृद्ध नेतृत्वाचे उच्चाटन व त्याचबरोबर बँकांचे राष्ट्रीयीकरण, संस्थानिकांचे तनखे व विशेषाधिकार यांचे उच्चाटन, ही पावले टाकून इंदिराजींनी देशात एक नवचैतन्य निर्माण केले, हे नाकारण्यात अर्थ नाही. १९६७ सालच्या निवडणु-कांच्या वेळी जनतेची मनःस्थिती कॉंग्रेस-विरोधी होती. त्यामुळे स. का. पाटील, अतुल्य घोष, पटनाईक, कामराज असे रथी महारथी पराभूत झाल्याचे दृश्य आपण पाहिले. कॉंग्रेसबद्दल म्हणजेच तेथे नेतृत्वाची मक्तेदारी स्थापन करणाऱ्या वृद्ध आणि कल्पनाशून्य नेत्यांबद्दल जनतेला आलेला संताप, त्यांना पराभूत करून व्यक्त करण्यात आला, असेच म्हटले पाहिजे. इंदिराजींचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी ही गोष्ट नेमकी हेरली व अवघ्या दोन महिन्यात त्या नेतृत्वाला पळता भुई थोडी केली. गेल्या काही दिवसांत जनमानसामध्ये इंदिरा गांधींची 'एक तडफदार राज्यकर्ती' म्हणून जी प्रतिमा उमटली आहे, तीत या नेतृत्वाच्या उच्चा-टनाचा फार मोठा वाटा आहे व मध्या-वधी निवडणुकीत ती प्रतिमा नव-कॉंग्रेसला अत्यंत लाभदायक ठरणार आहे.

मुलाखत
**य. स. दातार**

पंडित जवाहरलाल नेहरूंच्या हाती इंदिराजींपेक्षाही अधिक सत्ता होती. पण त्यांच्या मनावरील लोकशाही परंपरांचा प्रभाव, तसेच स्वातंत्र्य लढ्यात झुंजलेल्या सहकाऱ्याविषयींचा जिव्हाळा, यामुळे नकोशा वाटणाऱ्या नेत्यांना, पंडितजी इंदिरे इतक्या कणखरपणे दूर लोटू शकले नाहीत. कामराज योजना हा या दृष्टीने एक दुबळा प्रयत्न होता, कारण त्यात इंदिराजींचा पोलादी खंबीरपणा नव्हता.

अर्थात इंदिराजींच्या कणखरपणाचे कौतुक करतानाच हेही सांगितले पाहिजे की, इंदिराजींच्या हातून कम्युनिस्ट व जातीयवादी पक्षांना उत्तेजन मिळाले आहे. यांच्या राजकारणामुळे त्या शक्ती वेगाने डोके वर काढीत आहेत. राष्ट्रपती निवड-

**लोकसभेच्या मुदतपूर्व निवडणुकी येत्या मार्चमध्ये होत आहेत. या निवडणुकींसाठी सर्व राजकीय पक्ष हिरीरीने समरांगणात उतरले आहेत आणि आपापल्या पक्षालाच मत देण्यात देशाचे हित साठवलेले आहे असा प्रचार घूमधडाक्याने करीत आहेत. अशा या रणधुमाळीत कोणाला मत द्यावे असा सर्वसामान्य मतदाराला प्रश्न पडतो; म्हणून त्यांना मार्गदर्शन करण्याच्या हेतूने श्री. दि. वि. गोखले, श्री. स. ह. देशपांडे आणि श्री. सारस्वत या विचारवंतांचा परिसंवाद येथे सादर करीत आहो.**

**— संपादक.**

णुकीच्या वेळी इंदिराजींनी केलेले आवाहन बव्हंशी जातीय होतं. जगजीवनराम व फक्रुद्दीन अली अहमद यांच्या करवी इंदिराजींनी हरिजन व मुसलमानांची मते मिळविली. केरळातच काय, संबंध भारतात त्या सध्या मुस्लिम लीग व कम्युनिस्टांची मदत घेत आहेत. द्रमुकसारखा आत्यंतिक प्रांतिवादी व क्वचित राष्ट्रद्रोही पक्षही इंदिराजींमुळे आज पुरोगामी म्हणून वावरत आहे.

### इंदिराजींचा 'सुकार्नो' होईल ?

व्यापार व शस्त्रास्त्रे याबाबत आपण रशियावर अधिकाधिक विसंवत आहोत. आपले परराष्ट्रीय राजकारण तर जणू रशियाच्याच दिग्दर्शनाने चालले आहे. अशा परिस्थितीत इंदिरा गांधी आपल्या राजकारणासाठी, सत्तेसाठी कम्युनिस्ट पक्षाला विश्वासात घेऊ लागल्या, तर थोड्याच दिवसात त्यांचा सुकार्नो होईल, अशी भीती वाटते. सुकार्नोच्या सहाय्याने इंडोनेशियात कम्युनिस्टांनी आपली सत्ता वाढविली व योग्य वेळ येताच उठाव केला. भारतात हेच घडेल अशी शक्यता आहे. असा उठाव झाला, तर त्यात मुस्लिम लीग, द्रमुक, नागा, मिझो आदी फुटीरतावादीही सामील झाल्यावाचून राहणार नाहीत. इंदिरा गांधींच्या विद्यमान राजकारणाचा हा सर्वात मोठा धोका आहे. तो कोणालाही दृष्टीआड करता येणार नाही.

प्रत्येक राजकारणी पुरुषाला सत्तेचा हव्यास हा असतोच. पंडित नेहरूनाही तो हव्यास होता. पण त्यापायी कोणाशी किती प्रमाणात हातमिळवणी करावी, याच्या मर्यादांचे उल्लंघन पंडितजींनी केलेले नव्हते. त्यांच्या राजकारणामुळेच द्रमुकला त्यांच्या आमदानीत आजच्या एवढे यश लाभले नव्हते. केरळमध्ये त्यांनी योजलेल्या उपायांमुळे नंबुद्रिपाद सरकार गडगडले होते. परंतु इंदिराजी मात्र तशा मर्यादा पाळण्यास तयार नाहीत असे दिसते. केरळमध्ये मुस्लिम लीगशी हातमिळवणी करण्यात त्यांना कसलाही संकोच वाटला नाही. आज केरळ मुस्लिम लीगचा पुढारी त्या राज्याचा गृहमंत्री



### 'सुकार्नो' होण्याची भीती !

आहे. मुदतपूर्व निवडणुकीसाठी इंदिरा-काँग्रेसने मुस्लिम लीग, तसेच इतर कट्टर जात्यंध गटाशी अनेक प्रकारे, लिखित-अलिखित करार केले असणे शक्य आहे. स्वतःला पुरोगामी व समाजवादी म्हणविणाऱ्या इंदिराजी मुसलमानांना द्विभार्या-प्रतिबंधक कायदा लागू करण्यास तयार नाहीत, त्यांना तो विचारही सुचलेला नाही, हे ध्यानात ठेवण्याजोगे आहे.

इंदिरा–राजकारणाला विटून, इंदिराजींच्या विरुद्ध काही लोकशाहीवादी पक्ष एकत्र आले आहेत. रूढ अर्थाने त्यांना उजवी आघाडी म्हणता येणार नाही. कारण कामराज यांच्यासारखा प्रखर समाजवादी व सं. स. पक्षासारखा जहाल समाजवादी पक्ष त्या आघाडीच्या छत्राखाली आलेला असल्याने तिला उजवी आघाडी म्हणणे अयोग्य ठरेल. मात्र ही आघाडी फारशी यशस्वी होईल, असे वाटत नाही. कारण अखंड काँग्रेसमधील जे नेते ६७ साली अप्रिय ठरले, तेच इंदिरा विरोधात उभे ठाकल्याने लोकप्रिय होतील, ही आशा व्यर्थ आहे. या निवडणुकीनंतर संघटना काँग्रेस अधिकच दुर्बल बनेल. स्वतंत्र पक्ष आजच निम्मा अधिक आटोपलाच आहे. निवडणुकांनंतर तो फारसा शिल्लक उरेल असे वाटत नाही. त्यामुळे त्या आघाडीमुळे फायदा झालाच तर तो जनसंघ व संयुक्त समाजवादी या दोन युयुत्सु पक्षांचाच होईल. ती एक लाभदायक घटना मानावी लागेल.

मुदतपूर्व निवडणुकीस आर्थिक प्रश्नांना प्राधान्य देता येणार नाही. कारण बँकांचे राष्ट्रीकरण, संमिश्र अर्थव्यवस्था, छोट्या उद्योगधंद्याना उत्तेजन, संपत्तीचे समान वाटप आदी गोष्टींबाबत बव्हंशी पक्षांची मते ढोबळ मानाने सारखीच आहेत. त्याचबरोबर हेही खरे की, कोणताही पक्ष व आघाडी अधिकारारूढ झाली तरी ती आर्थिक प्रश्न झपाट्याने सोडवू शकणार नाही. कारण दारिद्र्य, बेकारी हे प्रश्नच अफाट आहेत. म्हणून मध्यावधी निवडणकीतील वादाचा मुख्य प्रश्न,



अनुक्रमणिका

भारतीय राजकारणाचा शकट निर्भेळ राष्ट्रवादी दृष्टीने हाकला जावा की, कम्युनिस्ट, मुस्लिम लीग आदींच्या सल्ल्याने व सहाय्याने हाकला जावा, हा राहणार आहे.

उजवे कम्युनिस्ट, मार्क्सवादी व नक्षलवादी यांचे राजकारण आज तरी अंगदी भिन्नभिन्न आहे. त्यांच्यातील भाऊबंदकी अतिशय तीव्र आहे. म्हणून त्यांची पावले परस्परांशी जुळती पडतील, हे आज तरी संभवत नाही.

उजव्या कम्युनिस्टांचे डोळे अखंड रशियाकडे लागलेले ! त्यामुळे त्यांचे राजकारण कोणत्याही तात्विक बैठकीवर चालणार नाही. याविरुद्ध मार्क्सवाद्यांचे राजकारण उजव्या कम्युनिस्टांपेक्षा कितीतरी जहाल असले, तरी ते त्यांच्या स्वतःच्या विचाराने व तंत्राने चालू आहे हे मान्य करायला हवे. गेली काही वर्षे त्यांचे डोळे पेकिंगकडे होते; परंतु त्यांची आजची परिस्थिती मात्र तशी नाही. पेकिंगच्या प्रभावाखाली सध्या असलेले लोक म्हणजे नक्षलवादी. ते प्रथम डाव्या व नंतर उजव्या कम्युनिस्टांचे उच्चाटन करण्याचा प्रयत्न करतील. पण त्यांना फारसे यश लाभेल असे मला वाटत नाही. सामान्य जनतेचा त्यांना पाठिंबा नाही हे स्पष्ट झाले आहे. त्यांच्या हिंसाचाराचा जनतेला वीट आला आहे व म्हणूनच पश्चिम बंगालमधील एकाद्या छोट्या प्रदेशाचेही त्यांना स्वतःच्या वालेकिल्ल्यात रूपांतर करता आलेले नाही.

या मुदतपूर्व निवडणुकीत माझ्या मते इंडिकेटला निर्विवाद बहुमत मिळणार नाही. त्यामुळे आजच्या प्रमाणेच उद्याही इंदिराजींना कम्युनिस्ट, मुस्लिम लीग, द्रमुक, अकाली वगैरे पक्षांवर अवलंबून रहावे लागेल. त्यामुळे मुसलमानांच्या बाबतीत सुधारणावादी, समाजवादी व द्रमुकबाबत कडक धोरणे स्वीकारणे इंदिराजींना अशक्य होईल. अशीही शक्यता आहे की, इंदिरा गांधी विजय मिळवून देऊ शकत नाहीत असे दिसल्यावर, त्यांचे नेतृत्व झुगारून देऊन नव्या नेतृत्वाखाली द्विखंड काँग्रेस पुन्हा अखंड होईल. या निवडणुकीतून तोही पर्याय निर्माण होऊ शकतो, असे मला वाटते.



घटका भरली, पण कुणाची !

महाराष्ट्रापुरते बोलायचे तर शिवसेना अद्यापी लहान आहे, तर शेतकरी कामकरी पक्षाचा विस्तार आणि जोम हे दोन्ही खूपच ओसरले आहेत. शिवसेना आज युयुत्सु व चैतन्यमय संघटना आहे. पुढील पाच वर्षात तिच्या ध्येय धोरणांना किती विस्तृत पाया लाभतो, यावर तिचे भवितव्य अवलंबून राहील.

**वृत्तपत्रांचे स्वातंत्र्य :**

इंदिराजींवर गेल्या दीड वर्षात हुकूमशाहीचे आरोप सतत होत असले, तरी या काळात वृत्तपत्र-स्वातंत्र्याचा संकोच झाला असे मानावयास मी तयार नाही. कोणताही राज्यकर्ता, कितीही लोकशाहीवादी असला, तरीही वृत्तपत्रे आपल्याच बाजूने राबावीत यासाठी तो सतत प्रयत्न करीत असतो. इंग्लंड व अमेरिकाही त्याला अपवाद नाहीत. भारतातही तेवढयाच प्रमाणात वृत्तपत्रांवर दडपण येते. त्यापेक्षा अधिक खचितच नाही.

उदाहरण देऊन सांगतो. मोरारजीभाई, द्विभाषिक मुंबईचे मुख्यमंत्री होते, त्यावेळी वृत्तपत्रांवर जेवढे दडपण आणले जात असे त्यापेक्षा अधिक प्रमाणात आज दडपण येते, असे वाटत नाही. त्यामुळे तसा दोषारोप याबाबत तरी मी इंदिराजींवर करणार नाही.

निवडणूक प्रचारासाठी वृत्तपत्रांच्या मालकांना व व्यक्तिगत पत्रकारांना प्रलोभने दाखविणे हीही गोष्ट नवीन नाही. भारतीय समाजातील नेकी व जिद्द झपाट्याने ओसरत आहे. चारित्र्यवान, ताठ कण्याची माणसे दुर्मिळ होत आहेत. वृत्तपत्रे हाही अखेर त्या समाजाचाच एक भाग आहे. त्यामुळेच वृत्तपत्रे विकत गेल्याचे आपण पाहातो ! पण तो दोष केवळ सरकारचाच नसून पत्रकारांचाही आहे, हे कबूल केले पाहिजे.

[ परिसंवाद पान ५४ वर ]



लाखो गृहिणी
**पोष्टमन** ह्या अत्यंत शुद्ध तेलात
**आपला सर्व स्वादिष्ट स्वयंपाक तयार करतात**
**आणि अधिक पौष्टिकता मिळवतात.**

**गेली ४० वर्षे त्या पोष्टमन तेल वापरीत आहेत, कारण :**

- भुईमुगाचे हे १०० टक्के शुद्ध तेल स्फटिकासारखे स्वच्छ असून त्याला वाईट वास नाहीं.
- हायड्रोजनचा वापर करून हे घट्ट करण्यात येत नाही. ते 'ए' व 'डी' व्हिटॅमिन्स युक्त आहे.
- काटकसरीचे ठरणारे हे तेल शिल्लक राहिले तर पुन्हा वापरता येते.

*पोष्टमनच्या डब्यावर उत्कृष्टतेचे प्रतीक असे सरकारी ॲग्मार्कचे चिन्ह असते.*
*आरोग्य, स्वाद, काटकसर यासाठी फक्त हे तेलच स्वयंपाकासाठी वापरा.*






अहमदमिल्स
मुंबई ८

**पोष्टमन: भारतातील सर्वांत अधिक खप असलेले स्वयंपाकाचे विश्वसनीय तेल.**

everest/1073b/AM mar

पोस्टमन पुरस्कारित 'मेरा घर, मेरा परिवार' हा रेडिओ कार्यक्रम मुंबई–पुणे–नागपूर नभोवाणीवरून विविध भारती कार्यक्रमात दर शनिवारी सकाळी ९–३० ते ९–४५ पर्यंत अवश्य ऐका !






अनुक्रमणिका



# दहा लाखाची

## चित्रकथा आणि सत्यकथा

### दृश्य पहिले

[ मे १९६९ मधील एक दुपार. स्थळ—काळबादेवी रस्ता, मुंबई येथील साईनाथ इंडस्ट्रीज्‌चे दुकान. पेढीवर मुख्य मागीदार हेमंत व्यास वय वर्षे २८, बसला आहे. हेमंत व्यास आकर्षक व्यक्तिमत्वाचा, गोरेपणाकडे झुकणारा, गव्हाळ वर्णाचा तरुण. रिमलेस् चष्म्यामुळे चेहऱ्यावर अधिक गोडवा. दुकानातला टेलीफोन अधूनमधून खण-खणतो आहे. न कंटाळता हेमंत टेलिफोन उचलत असतो. शांतपणे गुजरातीत संभाषण करतो. भाव आणि आकडे यांची देवाणघेवाण चाललेली असते. बाहेर ऊन रणरणते आहे. दुकानात पंखा गरगरतो आहे—आणि लक्ष्मीचा वरदहस्त असल्याने एकंदरीत डोळे निववणारेच वातावरण आहे. त्यामुळे बाहेरील गरमीचा दुकानातल्या वातावरणावर यत्किंचितही परिणाम नाही.

इतक्यात रजनीकांत चंदुलाल शहा वय वर्षे अंदाजे चाळीसच्या आसपास, घाई-गडबडीने येतात. 'केम रजनीभॉय्...' वगैरे वगैरे व्यापारी आगतस्वागत होते. मसाल्याचा चहा मागवला जातो. रजनीभाईच्या हातात टाइम्स ऑफ इंडियाचा एक अंक आणि कागदाचे एक भेंडोळे. निर्यात व्यापाराचे कमिशन एजंट हा त्यांचा व्यवसाय. ]

**रजनीभाई** हेमंत, एक महत्त्वाची बातमी घेऊन आलो होतो. तुझ्या फायद्याची आहे.

**हेमंत** फायदा असला तरच व्यापारी तोंड उघडेल ना ?

**रजनी.** (टाइम्स उघडून दाखवत) ही बघ या चौदा मे च्या अंकात ही जाहिरात आली होती. (वाचतो):

very profitable business and manufacturing technique available for items of world demand. Good

prospects for export. Several lakh orders at once available. Investment according to volume and scale. Write with your line of interest and funds capacity to Box No. 384222, The Times of India, Bombay.—कशी वाटली जाहिरात?

**हेमंत** मला काऽही समजलं नाही. Exportable item कसला आहे ते कुठं स्पष्ट केलंय् जाहिरातीत या?

**रजनी.** खाली पोस्ट बॉक्स नंबर दिलाय् ना चौकशी करण्यासाठी.

**हेमंत** तू खुशाल कर चौकशी. मला नाही वेळ.

(फोन घेत) हॅलो..हॅलो..हां साईनाथ इंडस्ट्रीज...)

**रजनी.** अरे मी चौकशी करून आलोय्. म्हणूनच सांगतोय् तुला.

**हेमंत** (अजूनही चेष्टेच्याच सुरात) बरं सांग तुझ्या चांभार-चौकशीची हकीकत.

**रजनी.** ही जाहिरात देणारा इसम डॉक्टर शर्मा म्हणून एक आहे. मी या पोस्ट बॉक्स नंबरच्या पत्त्यावर पत्र पाठविलं होतं. त्यानंतर हा डॉक्टर शर्मा माझ्या घरी भेटायला आला होता. तो अमेरिकेत राहून आलाय्. एम्. एस्सी. टेक्. आणि पीएच्. डी. झालाय्. शंभर टक्के देशी मालापासून व्हॅट् रंग तयार करण्याची नवी पद्धत शोधून काढलीय् त्याने. जगातील कोठल्याही देशातील पद्धतीपेक्षा

## —ना. व्यं. देशपांडे

ही त्याची पद्धत कमी खर्चाची आहे असं तो म्हणतो. इलेक्ट्रॉनिक पद्धतीने आपण रंग तयार करतो असा त्याचा दावा आहे.

**हेमंत** पण माझा रंगामध्ये एवढा काही इंटरेस्ट नाही.

**रजनी.** एवढा उतावळा होऊ नकोस हेमंत! व्हॅट रंगाचे मार्केट रेटस् ठाऊक आहेत? (एक कागद दाखवितो) आणि डॉक्टर शर्माच्या पद्धतीमुळे रंगाची कॉस्टप्राइस् इतकी होते (दुसरा कागद दाखवितो) काय प्रॉफिट् होईल कल्पना कर.

(हेमंतचा इंटरेस्ट वाढू लागतो.)

**हेमंत** बरं बरं. पुढं सांग.

**रजनी.** आता कसा लायनीवर आलास! मी डॉक्टर शर्माला घरी जेवायला बोलावलं. त्याला सांगितलं की तुझी स्कीम् जी असेल ती कागदावर लिहून दे. बेटा भलताच हुशार दिसतोय् रे. सगळी आकडेवारी तोंडपाठ! आम्हा गुजरात्यांना मागे टाकील. (आणखी एक कागद दाखवितो) ही त्याची स्कीम. त्याच्याजवळ बुद्धी आहे. पण भांडवल नाही. बघ तुझा काय विचार आहे तो.

[हेमंत सावकाशपणे कागद वाचतो आणि क्षणभर विचारमग्न होतो.]

**हेमंत** बरं मग. आपण भेटूया एकदा. प्रत्यक्ष चर्चा केल्याशिवाय काही खरं नाही. मी सांगेन तुला केव्हा जायचं ते.

**रजनी** अच्छा ऽ. मला फोन कर अगोदर (जातो).

***श्री. ना. व्यं. देशपांडे हे वकिलीचा व्यवसाय करतात. या व्यवसायात त्यांना अनेक भले-बुरे लोक भेटतात, विविध प्रकारचे अनुभव येतात. निरनिराळ्या खटल्यांशी त्यांचा संबंध येतो. शिवाय इतरही अनेक वैशिष्टय-पूर्ण खटल्यांकडे त्यांचे लक्ष असते. अशीच एक कथा 'सुपारीने दिली सुपारी' दीपावली-तून प्रसिद्ध झाली आहे. अशाच न्यायालयीन सत्यकथा ते 'दीपावली'च्या वाचकां-साठी सादर करणार असून 'योगेश्वरा-नंदजी महाराज' या नावाने प्रतिष्ठित कुटुंबांमध्ये वावरणाऱ्या एका लफंग्याची त्यांनी आपल्या विशिष्ट शैलीने लिहिलेली ही कथा...***

---

## दृश्य दुसरे

(मे महिन्यातील एक रात्र. नऊचा सुमार. फोर्टमधील 'टॉक् ऑफ दि टाऊन' या आलीशान हॉटेलासमोर दोन मोटारी उभ्या आहेत. एका गाडीचा नंबर MBG 7368 आहे. ती डॉक्टर शर्मा यांची आहे. दुसरी गाडी हेमंत व्यासची आहे. मोटारींजवळ डॉ. शर्मा, हेमंत, रजनीभाई वगैरे मंडळी उभी आहेत. डॉ. शर्मा टेरेलिन सुटात आहेत. डॉ. शर्मा यांचा एक हात हेमंतच्या खांद्यावर आहे. डॉ. शर्मा यांची अंगलट सडपातळ. बुटकी. वर्ण सावळा. कपाळ भव्य—बुद्धिमत्तेचे निदर्शक. डोक्यावर केस विरळ. टक्कल पडत असल्याची लक्षणे. चेहेरा अगदी सौम्य. चेहेऱ्यावर हुकमी हास्य आणता येईल असे इमानी स्नायू)

**शर्मा** (हेमंतची पाठ थोपटत) हे बघा. आपल्या दोनतीनदा चर्चा झाल्या. पण तुमचा अजून यावर विश्वास बसत नाही...

**हेमंत** (चाचरत) छे! छे! तसं नाही. ही एकदमच नवीन लाईन आहे. थोडा विचार करायला हवा.

**शर्मा** (हंसत) होय. तेही खरंच आहे. तुम्ही तरुण आहात. तरुणानं धाडस करायलाच हवं. म्हणतात ना—'साहसे श्री प्रतिवसति।'

**हेमंत** वाऽ म्हणजे तुम्हाला संस्कृतही येतं?

**शर्मा** अहो मला चौसष्ट कला येतात. नुसत्या कला येऊन काय उपयोग? तुमच्यासारखा गडगंज पैसा असता तरऽ? (मोठ-मोठ्याने हसतो) बरं. तुम्ही एकदा माझ्या घरी या. (व्हिजिटिंग कार्ड देतो). अगोदर फोन करा. घरामध्ये या पद्धतीची पायलट प्लँट तयार केली आहे. ती पहा. रंग कसा तयार होतो याचं प्रात्यक्षिकच दाखवितो.

**रजनी.** पायलट प्लँटही तयार केलीय्? व्वा! कमाल आहे!

**शर्मा** : 'चक्षुर्वैसत्यं' प्रत्यक्ष पहा नि मग विचार करा. अच्छा. गुडनाईट्.

(मोटारीत बसतात. लगेच मोटारीतून हाक मारतात.) मिस्टर व्यास....










**हेमंत** काय ?

**शर्मा** मी विसरलोच. परवा तुम्ही रंगाची सँपल्स मागितली होतीत. मी आणलीत् बरोबर. (दोन छोटया डब्या काढून देतो) तुमच्या खात्रीच्या इसमाकडून तपासून घ्या.

**हेमंत** ठीक आहे. गुडनाईट.

**शर्मा** घरी येण्यापूर्वी फोन करा हं. म्हणजे तुम्हाला निष्कारण फेरा नको पडायला. तुम्ही वर यायचं नि माझ्या प्लॅटला कुलूप असायचं ! (हंसतो)

**हेमंत** हो. हो. फोन नक्की करेल.

( शर्माची मोटार निघून जाते. )

रजनीमाय्... चालो साथे...

## दृश्य तिसरे

( जून महिन्यातील सकाळ. नारायण दामोळकर रोड. हेमंत व्यास मोटार चालवीत आहे. सीटवर बाजूस रजनीभाई )

**हेमंत** रजनीमाय्... काल रंगाची सँपल्स तपासून आणली.

**रजनी** काय म्हणतोय् टेस्ट रिपोर्ट ?

**हेमंत** पर्फेक्ट ! रंग उत्तम बनावटीचा आहे असा अभिप्राय आहे. कुठल्याही स्टॅंडर्ड रंगाच्या तोडीचा आहे असं तज्ज्ञ म्हणतात.... शर्माची बाकी कमाल आहे हं ! बुद्धी मारी चलाख. आपले इंडियन लोक काही अगदी हेऽ नाहीत.

**रजनी** हेमंतमाय्... आपला देश पहिल्यापासून स्वतंत्र असता तर आज जर्मनी जपानच्या तोंडात मारण्याइतकी प्रगती झाली असती.

( गाडी शेरमन बिल्डिंगपुढे येऊन थांबते. दोघंही बाहेर येतात. हेमंत प्रथम बिल्डिंग न्याहाळतो. )

छान् आहे नाही बिल्डिंग! इथं फ्लॅट घेऊन राहतोय् त्याअर्थी शर्मा काही अगदीच टिन्पॉट इसम दिसत नाही. चला जाऊ या वर.

( लिफ्टने वर जातात. फ्लॅट नं. १२ च्या दारासमोर हेमंत आणि रजनीभाई उभे. हेमंत बेल वाजवतो. दार उघडते. डॉक्टर शर्मा सुहास्यवदनाने स्वागत करतात. )

**शर्मा** या. या. नमस्ते. तुमचीच वाट बघत होतो.

( हेमंत दिवाणखान्यातील फर्निचर आणि सजावट न्याहाळत असतो. )

**हेमंत** छान् आहे फ्लॅट !

**शर्मा** (हंसत) भाडंही तसंच छान् आहे.

**हेमंत** : किती ?

**शर्मा** तेराशेपन्नास. त्याअगोदर डिपॉझिट्ही भरावे लागले साडे-चार हजार शिवाय भाडे आगाऊ भरावे लागते.

**हेमंत** बापरे !

**शर्मा** काय करणार काय ? तुमच्यासारखी बडी बडी मंडळी येतात. शिवाय आता मला या लाइनीत एस्टॅब्लिश् व्हायचे आहे. बरं काय घेणार ? थंडा की गरम ? चहा की कॉफी ?

**रजनी** कॉफी चालेल.

**शर्मा** सिसिल्ऽ इधर आव.

( घरकामासाठी ठेवलेली मुलगी सिसिल् बाहेर येते ) सिसिल् कॉफी टाक पाहुण्यांसाठी. (सिसिल् जाते) चला आतल्या खोलीत. कॉफी होईपर्यंत आपण माझा पायलट प्लँट बघून घ्या. (सर्वजण आत जातात).

## दृश्य चौथे

[ आतील खोली. खोलीच्या मध्यभागी एका टेबलावर एखाद्या प्रयोगशाळेत असते त्यासारखे दिसणारे एक उपकरण मांडून ठेवलेले दिसते. उपकरणाच्या एका टोकाला तळाशी एक भांडे आहे. त्याला एक काचेची नळी जोडलेली आहे. ती नळी वरच्या बाजूच्या एका भांड्याला जोडलेली आहे. त्या भांड्यातून दुसऱ्या बाजूने दुसरी नळी जोडली आहे. अशा रीतीने पाचसहा भांडी एकमेकांना रबरी व काचेच्या नळ्यांनी एकमेकास जोडली आहेत. उपकरणाच्या दुसऱ्या टोकाला शेवटच्या भांड्यातून नळी बाहेर पडलेली दिसत आहे. त्या नळीच्या वक्र टोकाखाली एक काचेचे भांडे ठेवलेले दिसते आहे. टेबलाच्या खालच्या अंगाला एक इलेक्ट्रिक मोटार जोडली आहे. त्याचे कनेक्शन बाजूलाच असलेल्या एका स्टीलच्या कपाटात ठेवलेल्या स्वीचबोर्डाला जोडले आहे. डॉ. शर्मा कपाटाचे दार उघडून एक-दोन बटणे खटाखट ओढतात. इलेक्ट्रिक मोटार सुरू होते. एका भांड्यातील द्रवपदार्थ उकळू लागतो. फर्रर् फर्रर् फस्स् फस्स् आवाज सुरू होतो. काही क्षणातच त्या द्रवपदार्थाची वाफ होऊन त्या जोडलेल्या मधल्या नळ्यांमधून व भांड्यांमधून जाऊ लागते. सरतेशेवटी दुसऱ्या टोकाला असलेल्या नळीतून पुनः सोनेरी रंगाचा द्रवपदार्थ बाहेर पडू लागतो. डॉ. शर्मा तो द्रव एका काचेच्या भांड्यात गोळा करतात. हेमंत आणि रजनीभाई अवाक् होऊन पाहात असतात ].

**डॉ. शर्मा** हा पहा झाला तयार रंग... आता थोडा वेळ तो सुकू दे. म्हणजे त्याची भुकटी तयार होईल .[स्वीचबोर्डाची बटणे पुनः दाबली जातात. यंत्राची हालचाल थांबते. क्षणभर स्तब्धता. डॉ. शर्मा दोघांच्याही चेहेऱ्याकडे प्रसन्न मुद्रेने आळीपाळीने बघतात.]

**हेमंत** वा ! छान आहे कल्पना.

**डॉ. शर्मा** : तब्बल पांच वर्षं संशोधन केलंय् महाराज. स्टेटस्मध्ये होतो त्यावेळी ! अधूनमधून आडाखे चुकायचे, पुनः दुरुस्त करायचे.









तहानभूक हरपून गेली होती माझी. पण शेवटी प्रयत्नांना यश आलं माझ्या. त्यावेळी स्टेटस्मध्ये एका रंगाच्या फॅक्टरीत काम करीत होतो मी. काम करीत असताना माझ्या मनात सदैव भारताविषयी विचार यावयाचे. अमेरिकेत भांडवलाला तोटा नाही. असला भांडवली खर्च आपल्या देशाला परवडण्यासारखा नाही हे मला कळून चुकले. तेव्हा संपूर्ण भारतीय सामान वापरून अशा प्रकारच्या यंत्राची उभारणी कशी करता येईल यावद्दल माझे सदैव चिंतन चाले.

**रजनीभाई** असल्या बुद्धिमान माणसाची दुर्दैवाने आपल्या भारतात पारख नाही. त्याचं चीज होत नाही.

**डॉ. शर्मा** अगदी खरं बोललात बघा. गुणांचं चीज करावं अमेरिकेनंच. मी या रंग प्रक्रियेबद्दल एक प्रबंध लिहून मिचिगन् युनिव्हर्सिटीकडे पाठविला. महिन्याभराच्या आतच मला डॉक्टरेट मिळालं. याला म्हणतात ॲप्रिसिएशन्.

**हेमंत** मग तिथंच का नाही राहिलात? तुमच्या गुणांचं चीज झालं असतं.

(बोलत बोलत सर्वजण दिवाणखान्यात येऊन सोफ्यावर बसतात.)

**डॉ. शर्मा** तुम्ही म्हणता ते खरं आहे. पण पैसा हे काही सर्वस्व नव्हे. मी भारतीय दृष्टीकोणातून विचार केला. मग त्याचा उपयोग अमेरिकेत करण्यात काय हंशील? भारतातील उद्योगपतींना त्याचा अधिक उपयोग नव्हता काय? शिवाय आपल्या देशाची प्रतिष्ठा किती वाढेल? हा सारासार विचार करून मी स्टेटस्मध्ये स्थायिक व्हायचं नाकारलं. मात्र अमेरिकेत आणि तसंच जिनिव्हातही पेटंट घेऊन ठेवलंय्. इथलंही घेतलंय्.

**रजनीभाई** तुमच्या पेटंटचा नंबर काय?

**डॉ. शर्मा** (किंचित् रोषाने) तुम्ही फारच खोलात शिरायला लागलात! आपली नुसतीच प्रारंभिक बोलणी चाललीत्.... एकदा का माझे ट्रेड सिक्रेट फुटले की....

**हेमंत** असं रागावू नका डॉक्टर! आम्ही व्यापारी मंडळी पैसा गुंतवायचा म्हणजे सगळ्या नीट चौकश्या कराव्या लागतात.

**डॉ. शर्मा** (चेहेरा बदलून) नाही. मी रागावलो नाही. पण मला नेहमी हाच अनुभव येतो. अनेकांनी मला विचारलं याबद्दल. पण प्रत्यक्ष पैसा घालून योजना कार्यान्वित करायची बोलणी पक्की होण्याअगोदर. त्यामुळं माझी अशी प्रतिक्रिया होते. It irritates me. पण let us forget about it. तुमचं झालं ना समाधान? आता नुकताच तयार झालेला रंग आहे ना? त्याचं सॅंपल् घेऊन जा बरोबर. त्याचीही तपासणी करून आणा. दर्जाबद्दल एकदा तुमची पुरेपूर खात्री झाली की मग पुढची बोलणी करू आपण. आपली कॉफी पिऊन होईपर्यंत रंग सुकेल. मग मी प्लॅस्टिकच्या पिशवीत सॅंपल् भरून देईन. बेटा सिसिल्....

**सिसिल्** कॉफी तयार आहे.

## दृश्य पाचवे

[फ्लोरा फौंटनजवळील जहांगीर वाडिया बिल्डिंग. या बिल्डिंगमध्ये मेसर्स जमनालाल अँड सन्स या उद्योगाचे ऑफीस. ऑफिसच्या मुख्य केबिनमध्ये रामकृष्ण बजाज बसले आहेत. त्यांच्या समोरच्या एका प्रशस्त खुर्चीवर अजित रामचंदानी बसले आहेत.]

**रामचंदानी** मी तुम्हाला या नवीन लाइनीबद्दल सांगितलं. डॉ. शर्माच्या घरीही आपण गेलो. तुम्ही ते इलेक्ट्रॉनिक प्रेशेमचं उपकरण आणि तसंच प्रत्यक्ष उत्पादनकृतीही पाहिलीत. मग तुमचा काय सल्ला आहे?

**बजाज** (डोकं खाजवीत) खरं म्हणजे मी याबद्दल विचारच केला नाही. आमचे मॅनेजिंग डायरेक्टर पुरुषोत्तमदास झुनझुनवाला यांना सांगितलं होतं याबद्दल सर्व नीट विचार करायला. डॉक्टर शर्माचा पायलट प्लॅंट पाहून मला बरं वाटलं. बेटा कल्पक डोक्याचा आहे खरं. एवढ्या प्लॅंटची निर्मिती करण्यासाठी बरीच रक्कम गुंतवावी लागेल. डॉक्टर शर्मा म्हणतो त्याप्रमाणे रंगाची प्रॉडक्शन कॉस्ट पुष्कळच कमी आहे. मार्केटमध्ये कॉंपिटिशन्मध्ये उत्पादकाला चांगलाच फायदा होईल यात शंका नाही.

**रामचंदानी** मग तुम्हीच का लक्ष घालत नाही यात? मीही यात काही भांडवल गुंतवू शकेन.

**बजाज** पण डॉक्टर शर्माला काही परसेंट प्रॉफिट्मध्ये दिला पाहिजे ना?

**रामचंदानी** तो देऊ त्याला; पण त्याचे सर्व हक्क आपण विकत घेतले पाहिजेत हं. नाहीतर तो डोक्यावर चढून बसेल आपल्या.

**बजाज** आम्ही याबाबत काहीतरी चर्चा केली होती खरं. थांब झुनझुनवालांनाच बोलावतो ना... (बेल वाजवतात. प्यून येतो) जरा झुनझुनवाला शेटना बोलाव.

(झुनझुनवाला येतात)

अहो परवा त्या डॉ. शर्मांना पाठविण्याच्या पत्राचा मसुदा तयार झालाय् ना? काय लिहिलंय् आपण त्यांना?

**झुनझुनवाला** पत्र पाठवून पंधरा दिवस झाले. मीच सही करून पाठविलं होतं ते पत्र. त्यांनी पाठविलं होतं ते पत्र. त्यांनी आपल्याला पेटंट विकावं म्हणजे त्यांना आपण टेक्निशियन् प्रॉडक्शन् मॅनेजर म्हणून नेमू, त्यांचा मेहेनताना देऊ शिवाय होणाऱ्या नफ्यामध्ये काही टक्का देऊ असं त्यांना कळवलं आहे. त्यांची संमती आल्यावर मग पुढचे करारमदार करता येतील.

**बजाज** मग त्यांनी अजून कळविलं नाही?

**झुनझुनवाला** मला दोन दिवसांपूर्वीच शर्मा भेटले होते. आपल्याला विचार करावयाला थोडा अवधी पाहिजे असे म्हणाले. वडीलधाऱ्या मंडळींचा सल्ला आणि आशीर्वाद घ्यायचा आहे म्हणे! त्यांचे वडील स्वित्झर्लंडमध्ये व चुलते झूरिचमध्ये आहेत. चुलते लौकरच भारतात परतणार आहेत. दोघांनाही त्यांनी पत्रे पाठविली आहेत. त्यांच्या उत्तराची आणि अनुमतीची वाट पाहताहेत.

**बजाज** जरा लौकरच त्यांचा निर्णय कळविण्यास सांगा फोनवर. तुम्ही कामत आणि शानभाग यांना बरोबर घेऊन पुन: एकदा तो पायलट प्लॅन्ट पाहून आलात ना ?

**झुनझुनवाला** हो बघून आलो ना !

**बजाज** ठीक आहे.. (झुनझुनवाला जातात) डॉ. शर्माच्या मनाचा काही थांगपत्ता लागत नाही. मध्येच त्यानं दोन-तीन गिऱ्हाइकं आणली होती. शर्मानं काही रंग तयार केला आहे. रंगाच्या कारखानदारीत त्याचं नाव अद्याप झालं नाही म्हणून आमच्या कंपनीतर्फे रंगाची विक्री करावी असं त्याचं म्हणणं. मी फक्त हूं म्हटलंय्. कोणी ग्रोव्हर नावाचा इसम त्यानं आणला होता. आम्ही रंगाच्या दरावद्दल वाटाघाटी केल्या; पण सर्व रक्कम तावडतोब रोखीनं भरायला ग्रोव्हर तयार नव्हता. म्हणून वाटाघाटी फिसकटल्या.

**रामचंदानी** :. अलीकडे तो हेमंत व्यास एकसारखा डॉ. शर्माबरोबर फिरत असतो. एकदा ताजमध्ये मी एका लग्नाच्या रिसेप्शनला गेलो असताना ताजमधून ते दोघंही बाहेर पडत असताना दिसले.

**बजाज** होय होय. हेमंत व्यासला एकदा डॉ. शर्मानी माझ्याकडे आणलं होतं. मोठा उमदा पोर आहे. तोही बारकाईनं चौकशी करीत होता माझ्याकडं. मार्केट रेटबद्दल चर्चा झाली होती आमची.

**रामचंदानी** बरोबर आहे. आपली आणि शर्माची बोलणी चालली आहेत हे त्याला ठाऊक आहे. हे करारमदार झाले की पुढे आपल्याशीच संबंध येणार. म्हणून तर...

**बजाज** : अजून कुठं काय झालंय् ? सारं तर अद्याप कागदावरच आहे.. रंगाच्या विक्रीबाबत बजाज हाऊसनं त्याला मदत करावी असं त्यांचं म्हणणं. मी हूं म्हटलंय् इतकंच. पण स्कीमबद्दल म्हणशील तर त्यानं आमच्या पत्रातील अटींना संमती दिल्याशिवाय काही खरं नाही.

**रामचंदानी** हां. ते तर खरंच !

## दृश्य सहावे

[ऑगस्ट १९६९. साईनाथ ट्रेडिंग कंपनीचे दुकान. दुकानाबाहेर डॉ. शर्मा यांची WBG 7668 ही गाडी उभी आहे. दुकानात डॉ. शर्मा आणि हेमंत व्यास बोलत बसले आहेत. त्यांच्यासमोर फंटा-ऑरेंजच्या दोन रिकाम्या बाटल्या.]

**डॉ. शर्मा** : परवा दिलेलं सँपल् तपासून आणलं का ?

**हेमंत** हो तर. चांगला आहे माल.

**डॉ. शर्मा** मग काय ठरला तुमचा विचार ?

**हेमंत** हे बघा. मी त्यावर विचार केला. प्लँट निर्मितीबाबत माझा काही इंटरेस्ट नाही. कोणी प्लँट बनविला तर मी तो विकत घ्यायला तयार आहे.

**डॉ. शर्मा** : बजाज इंडस्ट्रीजनं तर एक प्लँट बनवला आहे. याबाबत त्यांचं एक पत्र आलं आहे. (पत्र काढून दाखवितो. हेमंत पत्र वाचतो.)

**हेमंत** : मग काय ? तुमचा करार झाला ?

**डॉ. शर्मा** (विषण्ण मनाने) छे !

**हेमंत** का ?

**डॉ. शर्मा** : का ? 'का' म्हणून विचारता ? जिथं तिथं ही भांडवलशाही बुद्धिमान माणसाचा ग्रास घेऊ पाहते. त्यांना मी व माझी बुद्धी विकत हवी आहे. तीन हजाराच्या पगारावर मला ते नोकरी देऊ बघतात आणि फायद्यात तीन टक्के भागीदारी. मला गुलाम बनवायचा त्यांचा विचार आहे. एवढ्या मोबदल्यात त्यांना माझी बुद्धी आणि संशोधन विकत घ्यायचं आहे.

**हेमंत** : तुमच्या इलेक्ट्रॉनिक प्रोसेसमुळे क्रोडो रुपयांचा फायदा होणार आहे असं तुम्ही म्हणता. मग महिना तीन हजार रुपये व फायद्यामध्ये तीन टक्के भागीदारी, हा व्यवहार काय नुकसानीचा आहे ?

**डॉ. शर्मा** (उसळून) ती काय माझ्या संशोधनाची किंमत झाली ? नको. नकोच तो विचार. एका मोठ्या संस्कृत नाटककारानं म्हटलंच आहे की, "उत्पस्यते च मम कोऽपि समानधर्मा
कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी"

**हेमंत** म्हणजे काय ?

**डॉ. शर्मा** काल अनंत आहे व पृथ्वी मोठी आहे. नाटककारानं आपल्या टीकाकारांना उद्देशून हे उद्गार काढले आहेत. थोडी कळ सोसावी लागेल. थोडं आणखी थांबावं लागेल. काही हरकत नाही. माझ्या विद्वत्तेचं चीज करणारा कुणीतरी पारखी भेटेलच की !

**हेमंत** मग त्या तयार केलेल्या प्लँटचं काय करणार ?

**डॉ. शर्मा** (कष्टी चेहेऱ्यानं) तीच चिंता मला पोखरून काढीत आहे.

**हेमंत** का ?

**डॉ. शर्मा** आमच्या वाटाघाटी जवळजवळ फिसकटल्यासारख्याच आहेत. पण या आधी त्या प्लँटवर ट्रायलसाठी दहा टन रंग तयार करून बसलो आहे. प्लँट उभारणीचा खर्च दिल्याशिवाय बजाज तो प्लँट ताब्यात देणार नाहीत आणि रंग विकल्याशिवाय मला पैसे उभारता येणार नाहीत.

**हेमंत** मोठाच पेच आहे की !

**डॉ. शर्मा** बघा. तुम्ही घेता का रंग ?

**हेमंत** (गडबडून) अंऽऽ

**डॉ. शर्मा** मी थोडी नुकसानी सोसूनही तुम्हाला स्वस्त दराने देईन. मागे तुम्ही एक आख्खे पिंप विकत घेतले होते आठवते ना ? त्या रंगाबद्दल तुमची एकदा खात्री झालीच आहे.

**हेमंत** (क्षणभर विचार करीत) पण तुमचा दर ?

**डॉ. शर्मा** दर तुम्हाला ठाऊक आहेच मार्केटमध्ये किलोमागे दोनशे रुपये दर आहे. मी तुम्हाला एकशेदहाच्या भावात देईन. दहा लाखाच्या आसपास किंमत होईल.

**हेमंत** रक्कम बरीच मोठी आहे. पण मी विचार करून सांगतो. मला अगोदर माल पाहू दे. त्यातले एकादे सँपल घेऊ दे मग ठरवीन काय ते !









**डॉ. शर्मा** ठीक आहे. Take your own time. मग जाऊ मी ?

( उठतो )

**हेमंत** हे बघा डॉक्टरसाहेब, तुमची आणि बजाज यांची बोलणी झालीत. प्लँट तयार करण्यात त्यांची रक्कम गुंतली आहे. तेव्हा रंग विकण्याबाबत त्यांची काही कायदेशीर हरकत नाही ना ? या विक्रीबद्दल त्यांची अनुमती लागेल. नंतर उगीच कुणाच्या कायदेशीर हक्काचे लफडे निर्माण नको व्हायला आणि कोर्टकचेऱ्यांच्या पायऱ्या चढायची पाळी नको यायला.

**डॉ. शर्मा** त्याची नको तुम्हांला फिकीर. (किंचित् विचार करून). नाहीतर असं केलं तर ?

**हेमंत** काय ?

**डॉ. शर्मा** तुम्ही स्पष्टच बजाजना विचारा ना ? मग तर तुमची खात्री होईल.

**हेमंत** ठीक आहे.

( डॉ. शर्मा मोटारीतून निघून जातात )

महेन्द्रभाय् . . .

( महेन्द्रभाई ठक्कर, साईनाथ इंडस्ट्रीज्मधील हेडक्लार्क, येतो )

**महेंद्र** : काय ?

**हेमंत** डॉ. शर्माला रंग विकायचा आहे आपला. जवळजवळ दहा लाखापर्यंत किंमत होईल. तुम्हाला काय वाटते ?

**ठक्कर** भाव तर आपल्याला किफायतशीर होईल. मार्केट रेट बराच आहे.

**हेमंत** पण त्यानं खरोखरीच एवढा माल तयार केला आहे काय ?

**ठक्कर** केला असावा असं वाटतं. भायखळ्याला त्यानं एक गोडाऊन भाड्यानं घेतल्याचं मी ऐकलं आहे. तसेच बेलासिस रोडवरून त्यानं दोनशे बॅरल्स खरेदी केल्याचं रजनीभाई बोलत होते. आपण गोडाऊनवर प्रत्यक्ष जाऊन बघायला काय हरकत आहे ?

**हेमंत** ते तर बघायचंच. त्या पिंपामधलं सँपलही घेऊच ना.

**ठक्कर** मला काही वावगं दिसत नाही.

**हेमंत** बजाजना एकदा भेटून आलं पाहिजे. हो. नसतं लफडं नको गळ्यात बांधून घ्यायला.

## दृश्य सातवे

[ पुन: जमनालाल अँड सन्सचे ऑफीस. केबिनमध्ये रामकृष्ण बजाज, हेमंत, डॉ. शर्मा, अजित रामचंदानी बोलत बसले आहेत.]

**हेमंत** रामकृष्णजी, माझी आणि डॉ. शर्मा यांची काय बोलणी झालीयत् ती तुम्हाला सांगितलीच आहेत . . . या व्यवहाराला तुमची कांहीं हरकत ?

**बजाज** आमची काय हरकत असणार ? आमच्यातर्फे माल विकायचा असल्यास आम्ही काही कमी दराने माल देणार नाही. जर शर्माच तुम्हाला माल स्वस्तात पुरविण्यास तयार असले तर आम्ही काय म्हणून अडविणार ? ते तुमचं तुम्ही पहा. आम्ही मध्ये पडू इच्छित नाही.

**हेमंत** पण रंगाच्या बाबतीत डॉ. शर्मा आणि तुम्ही . . . .

**बजाज** तुमचा डायरेक्ट डील होत असेल तर आम्ही मध्ये पडणार नाही. पण एवढ्या कमी किंमतीत माल पाडून घेत आहात म्हणजे डॉ. शर्मांच्या परिस्थितीचा फायदा घेत आहात असं मला वाटतं.

**हेमंत** असं कसं ? मी त्यांना इतर काही सवलती मिळवून देणार आहे.

**बजाज** माझा प्रश्न येतोच कुठे ? I do not come in the picture at all. You can go ahead.

**हेमंत** ठीक आहे मग. चला.

( हेमंत व डॉ. शर्मा बाहेर येतात. )

**डॉ. शर्मा** मला वाटतं हेमंतभाई . . . की आपण हा व्यवहार मोडून टाकू या ! तुम्हाला माझ्याविषयी खात्री वाटत नाही. गेले दोन महिने तुम्ही कसून चौकशी केली आहे. वेळोवेळी रंगाची सँपल्स नेली आहेत. एवढेच नव्हे तर तीस हजारापर्यंतचा मालही नेला आहे. तेव्हा आपण इथंच थांबलो तर बरं होईल. I value your friendship more than the business deal.

**हेमंत** :(डॉ. शर्मांचा हात हातात घेत) गैरसमज करून घेऊ नका ! रक्कम फार मोठी आहे. तुमची आणि बजाज यांची बोलणी झालीत. बजाज यांनी तोंडी जरी आश्वासन दिलं असलं तरी मला त्यांच्याकडून लेखी कन्फर्मेशन् हवंय्. त्याला तुम्ही कबूल असाल तर घेईन मी रंग.

**डॉ. शर्मा** (विचार केल्यासारखा चेहेरा करून ) मग ठीक आहे. माझी काही हरकत नाही. मग केव्हां ऽ

**हेमंत** आज ऑगस्टची तीस तारीख आहे. एक सप्टेंबरला आपण करार करू.

**डॉ. शर्मा** ठीक आहे. माझ्याबरोबरच चला तुम्ही. मी आताच बजाज यांच्या नावे पत्र लिहून त्यांच्याकडून कन्फर्मेशन मागतो. तुमच्याकडे या पत्राची एक नक्कल देतो म्हणजे झालं.

**हेमंत** चालेल चालेल.

---

**स्वामी योगेश्वरानंद उर्फ शिवनाथ जयस्वाल उर्फ एस. के. गुप्ता, उर्फ विक्रमभानू गुप्ता, उर्फ अरुणकुमार बसर, उर्फ डॉ. सुशीलचंद्र शर्मा हे गृहस्थ कुठे आहेत ?...त्यांचा सध्याचा नवा पत्ता (आणि कदाचित नवे नावही) आम्हाला माहीत नाही... पण त्यांच्या पराक्रमाची कथा मात्र माहीत आहे...**

**दहा लाखाची सत्यकथा नि चित्रकथा**

**—ना. व्यं. देशपांडे**

**या कथेचा उत्तरार्ध मार्च १९७१ च्या 'दीपावली'त वाचा !**

---

अनुक्रमणिका

## दृश्य आठवे

[ स्थळ शेरमन् बिल्डिंग, नारायण दाभोळकर रोड. तारीख दोन सप्टेंबर १९६९. हेमंत डॉ. शर्मांच्या दारावरची बेल वाजवतो. दार उघडते ]

**डॉ. शर्मा** (किंचित् रोषाने ) पुनः कशाला आलात ?

**हेमंत** तुमचा गैरसमज दूर करायला.

**डॉ. शर्मा** गैरसमज तुमचा झाला आहे. माझा नाही.

**हेमंत :** आपण जरा आत थोडं बोलत बसू या.

**डॉ. शर्मा** या आत, पण बोलण्यानं काय साधणार आहे ?

( दोघंही आत येतात. )

मी तुम्हाला गोडाऊन दाखविलं. तुम्ही तुमच्या नोकराकडून पुनः त्यातीलही सँपल्स नेलीत व तपासून आणलीत. आमचा कस्टोडियन मलकानी याच्याकडून गोडाऊनच्या एका कुलुपाची चावीदेखील तुमच्या स्वाधीन केली. तुम्ही मला युनायटेड कमर्शिअल बँकेवरचा दहा लाख बेचाळीस हजाराचा चेकही दिलात. मी तुम्हाला त्याची पावती पण दिलीय्. चेक वटविला गेला की सर्व माल संपूर्णपणे तुमच्या स्वाधीन करायचं ठरविलं होतं. मलकानी तुम्हाला आमच्या दुसऱ्या कुलुपाची किल्ली देणार होते. खरं ना ?

**हेमंत** ते खरं. पण....

**डॉ. शर्मा** हे सगळं ठरूनदेखील तुम्ही बँकेला 'स्टॉप पेमेंट'ची इन्स्ट्रक्शन् दिली. मी चेक वटवायला गेलो आणि तोंड काळं करून आलो. बेअब्रू माझी झाली. आणि वर तुम्ही म्हणता... माझा गैरसमज झालाय म्हणून.

**हेमंत** माझं ऐकून घ्या तरी डॉक्टरसाहेब. आपल्या कराराप्रमाणं तुम्ही व्रजाज हाऊसकडून कन्फर्मेशन लेटर आणून देणार होतात. ते तुमच्याकडून आलं नाही म्हणून बँकेला मी तसं कळविलं.

**डॉ. शर्मा** कन्फर्मेशन लेटरबद्दल मी माझी अडचण कळविली होती.

**हेमंत** आता माझी खात्री झालीय्. मी काल वजाजना परत भेटलो. त्यांच्यातर्फे माल घ्यावयाचा असल्यास ते या किंमतीला कबूल नाहीत. पण तुमच्याकडून डायरेक्ट माल घेतल्यास त्यांची ना नाही. मालाच्या कायदेशीर हक्काबद्दल माझी खात्री झालीय्. आता कन्फर्मेशनचा प्रश्न नाही. मी तुम्हाला दुसरा चेक देतो.

**डॉ. शर्मा** (किंचित् उपरोधाने) आता चेक देणं पुरे झालं. मला वाटतं झाला तो तमाशा बस्स झाला.

**हेमंत** तुमचीच Phrase आहे ना ? Let us forget about it ! मी चेक देतो दुसरा.

**डॉ. शर्मा** (विचार करीत) हे बघा व्यास. तुमच्या मनात खरोखरीच हा व्यवहार पुरा करायचा असेल तर मला रोख पैसे द्या. रोकड हवीय् मला. कॅश्...

**हेमंत :** ठीक आहे. मला पाच–सहा दिवस सवड द्या.

**डॉ. शर्मा:** हरकत नाही. दहा दिवस घ्या... मी तुम्हाला वजाजकडून कन्फर्मेशन लेटरही देववतो, पण अगोदर मला कॅश द्या आणि माल उठवा.... बरं ते जाऊ द्या. आता परस्परांविषयीचे गैरसमजाचे धुके वितळू लागलंय्. कॉफीच्या पेल्यात बुडवू या आता ते ... सिसिल् बेटा

## दृश्य नववे

[ दहा सप्टेंबर १९६९. वेळ सकाळी अकराची. साईनाथ इंडस्ट्रीजचा फोन खणखणतो. हेमंत फोन उचलतो. ]

**हेमंत** हॅलो ऽ कोण ऽ हां हां. डॉक्टरसाहेब बोला. कोण? मलकानी आलेत ? डिलिव्हरीसंबंधी बोलणी करायला ? ठीक. ठीक. मी येऊ ? आताच. बरं. बरं... येतो.

## दृश्य दहावे

[मायखळा येथील ससेक्स रोडवरील एक गोडाऊन. परशराम मलकानी, हेमंत व्यास बाहेर उभे. ]

**मलकानी** (कुलुप उघडीत) हं... आता तुमची चावी फिरवा आणि तुमचं कुलूप उघडा.

**हेमंत** (कुलूप उघडतो) चला आत.

**मलकानी** हे बघा. दोनशे पिंप जय्यत तयार आहेत. नीट तपासून घ्या. (एका पिंपाकडे बोट दाखवीत) हाच तो परवाचा ड्रम. तुम्ही खडूनं त्याच्यावर सही केलीत. त्यातूनच परवा तुम्ही सँपल नेलंय्. आहे ना बरोबर. झाली तुमची खात्री.

( हेमंत एकवार सर्व पिंपांभोवती फेरी मारून येतो )

**हेमंत** ठीक आहे. मग केव्हा न्यायचा माल ?

**मलकानी** ते शर्माजी कळवतील तुम्हाला आज. त्यांच्याकडून कळल्यानंतर कॅश घेऊन या. माझं काम ही किल्ली तुमच्या स्वाधीन करायची. हुकुमाचा चाकर मी. तेवढं केलं म्हणजे मी मोकळा झालो.

**हेमंत** बरं. बरं. करा दार बंद आता.

( दार लावतात, आपापली कुलुपें लावल्यानंतर जातात )

## दृश्य अकरावे

[ त्याच दिवशी दुपारी दोन वाजता साईनाथ इंडस्ट्रीजचा फोन वाजतो. हेमंत फोन उचलतो. ]

**हेमंत** हॅलो. साईनाथ इंडस्ट्रीज्. हेमंत व्यास स्पीकिंग. कोण ? डॉ. शर्मा ? हां हां. नमस्ते. नमस्ते. काय ? आत्ता येऊ? (घड्याळाकडे बघत) दोन वाजलेत. हां. हां. नाही नाही... मी रक्कम काढून ठेवलीय्. सगळी जमा नाही झाली. थोडे कमी आहेत. चालेल ना ? बाकीचे देतो चारपाच दिवसांत. डिलिव्हरी झाल्यानंतर. चालेल ना ?... पण एवढी रक्कम तुम्ही जवळ बाळगणार ?.... पण बँक आता कशी उघडी राहणार ? अच्छा ऽ बँकेचाच मनुष्य आलाय् होय ? बरं बरं. मग मी निघतोच. अच्छा ! (फोन ठेवतो) महेंद्रभाय् तुम्ही चला माझ्याबरोबर. सूटकेस घ्या बरोबर.

**ठक्कर** घेतो.

(पान ६६ वर पहा)








# हरवलेला मधुचंद्र

## प्रभाकर पेंढारकर

हे एक वरच्या दर्जाचे कादंबरीकार आहेत. यांची प्रथम ओळख 'दीपावली'तील त्यांच्या 'प्रतीक्षा' या पहिल्या कादंबरीनेच वाचकांना झाली. त्यांच्या त्या पहिल्यावहिल्या कादंबरीने 'दीपावली'च्या कादंबरी-स्पर्धेत पहिला क्रमांक पटकावला होता. त्यानंतर त्यांची 'आज अचानक गाठ पडे' ही दुसरी कादंबरीही 'दीपावली'तूनच प्रसिद्ध झाली. या दोन्ही कादंबऱ्यांची चोखंदळ रसिक वाचकांनी आणि समीक्षकांनीही मुक्तकंठाने स्तुती केली. त्याच श्री. पेंढारकर यांनी खास 'दीपावली'साठी लिहिलेली ही तिसरी कादंबरी......



अनुक्रमणिका

मोटारीनं वळण घेतलं तसा थंडगार वाऱ्याचा झोत आत आला. माझी विचारांची साखळी तुटली. मी मोटारीची माझ्या बाजूची काच वर चढवली. मृणालनं तत्परतेनं स्कार्फ माझ्या हातात दिला.

"थंडी असेल म्हणाले होते मी !"

"म्हणून तर स्वेटर घातला !"

"तेवढयानं काय होतं ! ही काय मुंबईची थंडी आहे ? स्कार्फ गुंडाळा ना !"

मी बोललो नाही. स्कार्फ गळ्याभोवती गुंडाळला. मृणालनं तिच्या बाजूची काच अगोदरच वर केली होती. अजीजीच्या सुरात ती ड्रायव्हरला म्हणाली, "अपने बाँये हाथकी काच भी जरा उपर करो ना !"

बाहेरच्या थंडीचा त्या चेपटया नाकाच्या गोऱ्यापान ड्रायव्हरला पत्ताच नव्हता. मृणाल बोलली तसा एकदम जागा झाल्यासारखा तो 'हां जी !' असं काही तरी पुटपुटला. एक हात गाडीच्या स्टिअरिंगवर ठेवून वेग कमी न करता त्यानं काच चढवली.

मृणालनं अगोदरच अंगात वूलनची केप चढवली होती. आता त्यावरून तिनं शाल ओढून घेतली. माझ्याकडे पाहून उगीचच हसल्यासारखं तिनं केलं. माझा चेहरा निर्विकार राहिला असावा. चिकाटी न सोडता मृणाल म्हणाली, "हवेत बरीच थंडी आहे, नाही ?"

हो, हवेत थंडी होती. ती असायचीच ! मुंबईतला घाम जितका नित्याचा तितकीच हिमालयातली ही हवा नेहमीची ! त्यावर काय भाष्य करायचं !

"करशाँग गेल्यावर ती आणखीन् वाढेल !"

हो वाढेल ! तू म्हणतेस ते मान्य आहे. मग मृणाल आणि काहीतरी असंच बोलली. मी त्यावर होकारार्थी मान हालवली. मृणालनं विचारलं–

"करशाँगला चहा घेऊया !"

"नको, पोहोचायला उशीर होईल !"

"काय बिघडलं, आपलं रिझर्व्हेशन तर झालेलं आहे !"

"बरं घेऊ ...!"

"चहाबरोबर गरम पकोडे घेऊया !"

आणि असंच काहीतरी !

मघा जसा थंड वाऱ्याचा झोत आला, तशीच आता एकदम एक जाणीव झाली. आमचा जवळजवळ तासाचा प्रवास झाला. पण मी मृणालशी काहीच बोललो नव्हतो. हिमालयाची चढण, वळणावळणाचा नागमोडी रस्ता, बाजूची हिरवीगार वनश्री, आणि ही कुंद हवा !

धुक्याचे ढग तरंगत होते. त्यातून दिसणारी आजुबाजूची झाडं, खाली दूरवर उतरणीवरची घरं, भातशेतीचे हिरवेपिवळे पट्टे सगळंच अधुनमधून अदृश्य होऊन जायचं. वाटायचं ही मोटार नाहीच. आमचा प्रवास विमानातून चालला आहे. ढगांवर तरंगतो आहोत आम्ही !

त्यात ही थंडी ! उब हवीहवीशी वाटवणारी ! मृणालच्या शेजारी सरकून बसायला हवं. तिच्या अंगाभोवती लपटलेल्या शालीत आपणही घुसायला हवं ! त्यानं मृणाल सुखावेल. इतक्या दूरवर आल्याचं एवढया छोटयाशा गोष्टीनंही तिला सार्थक झाल्यासारखं वाटेल.

लग्नाला पंधरा वर्षं उलटली, तरीही मृणाल अद्याप सुरेख दिसते. पूर्वी ती साधी होती. आता तिच्या सौंदर्यावर मुंबईच्या नागर रहाणीचे संस्कार झाले. मृणालचे केस केवढे लांब होते ! दोन बाळंतपणात ते कमी झाले; पण तिनं मोठा थोरला आंबडा घातला आहे. प्रवासात असूनही पापण्यावर हालकेच काळी पेन्सिल फिरलेली आहे. ओठावर फिक्की लिप्स्टीक आहे. मृणाल अंगानं भरली, पण तिला काही लठ्ठ म्हणता येणार नाही. मृणाल अद्याप सुरेख दिसते आहे !

अशी सुरेख मृणाल शेजारी आहे.

हिमालयातलं रम्य वातावरण–

ही कुंद थंडी.

आजुबाजूच्या धुक्यामुळं मिळालेला त्यातच मिळालेली गाडीच्या वेगाची धुंदी !

––आणि मी हा असा !

प्रेसमध्ये येऊ घातलेल्या मशिनरीचा विचार करतो आहे. इन्डस्ट्रीयल फायनान्स कॉर्पोरेशनचं अद्याप उत्तर नाही. त्यांनी कर्ज मंजूर केल्याचं उत्तर एव्हाना यायला हवं. दिनकरनं ताजमध्ये दिलेली पार्टी फुकट जायची.

वास्तविक ह्या सर्वांचा मला ह्या वातावरणात विसर पडायला हवा; पण अगदी झटकून टाकायचं ठरवलं तरी हे विचार माझी पाठ सोडत नाहीत.

"चीज़ पकोडे तुम्हाला आवडले होते, नाही ?"

–मृणालनं विचारलं.

माझ्याशी बोलायची, मला बोलतं करायची मृणालची केविलवाणी धडपड चालली आहे. माझ्या ती लक्षात आली तसं माझं मलाच वाईट वाटलं. मुंबईबाहेर पडायची ही वेळ नव्हती; पण पडलो. मृणालमुळं पडलो. म्हणून माझ्या मनात कुठंतरी राग साचला आहे का ? मी माझ्या मनाचे कप्पे शोधू लागलो.

नवीन प्रिंटींग मशीन घ्यायचं ज्या दिवशी नक्की झालं त्याच्या दुसऱ्या दिवशी मृणालनं मला विचारलं, "पंधरा दिवसांची मुदत पुरे का ?"

"कशाला ?"

"रजा मंजूर व्हायला !"

"कुणाची ?"

"तुमची !"

"माझी ?"

"हो ! वीस तारखेपासून तुम्ही रजा घ्यायची, सोमवार आहे. चांगली पंधरा दिवसांची तरी रजा घ्या !"

मी मृणालकडे पहातच राहिलो. ती माझी चेष्टा करते आहे काय, मला समजेच ना !

"कशाला ?"

"सांगते ना. पण घेणार ना रजा !"

खरं सांगायचं म्हणजे आजपासून रात्री घरी यायला रोज उशीर होईल म्हणून मृणालला मी ऑफिसला निघताना सांगणार होतो. नवीन मशीन यायचं म्हणजे अनेक कामं एकदम एका वेळी उमटणार होती. पैसे उभे करण्यापासून सरकारी अधिकाऱ्यांची परवानगी मिळवण्यापर्यंत ! वास्तविक हे मशीन सेंट्रल








प्रिंटींग प्रेसने मागवलेलं. आयत्या वेळी काही अडचणी निर्माण झाल्या म्हणून त्यांनी आम्हाला विचारलं, तुम्ही मशीन घेता का ? अशी संधी परत मिळणं कठीण. पण आलेल्या ह्या संधीचा उपयोग करून घेणं त्यापेक्षा अवघड !

दिनकर 'हो' म्हणून आला. तेव्हा आम्हाला मार्ग राहिला नाही. मशीनची अर्धी किंमत आम्ही पार्टनर्सनी वैयक्तिक कर्जातून उभी करायची, राहिलेल्यासाठी कॉर्पोरेशनचं कर्ज घ्यायचं–हे नक्की केलं. सगळं काल ठरवलं आणि आज बायको विचारते आहे–रजा घेता का ? पंधरा दिवसांची !

"सांगा ना !"

"खरं सांगू मृणाल, सध्या मरायलाही फुरसत नाही !"

"पण आपल्याला मरायचं थोडंच आहे !"

मृणालच्या विनोदाचं कौतुक करण्याच्या मूडमध्ये मी नव्हतो.

"नाही जमायचं !"

"का ?"

"नवीन प्रिंटींग मशीन घेतो आहोत आम्ही. पैशाची व्यवस्था, ट्रेण्ड माणसं, नवीन ऑर्डरी...!"

मी बोलायचा थांबलो. मृणालचं माझ्या बोलण्याकडे लक्ष नव्हतं. ती उठली, आणि कपाटातून एक पाकीट घेऊन माझ्यासमोर उभी राहिली.

"खरंच नाही का जमायचं ?" – काकुळतीला येऊन तिनं विचारलं.



"नाही, खरंच नाही !"

"बरं, तर मग !"

ड्रेसिंग टेबलसमोर उभं राहून मी टाय बांधू लागलो. कॉटवर बसलेली मृणाल मला आरशात दिसत होती. टायची नॉट मी बरोबर करत होतो. मृणालनं मला विचारलं,

"का रजा घ्यायला सांगत होते ते तरी विचारायचंत् !"

"अं हो, का, का सांगत होतीस ?"

"जाऊ दे आता !"

"सांग तरी !"

"ऑफिसला उशीर होतोय !"

"अं, होतोय्. तेव्हा सांगून टाक लवकर !"

मृणाल बोलली नाही. तशीच खाली मान घालून उदास बसून राहिली. मृणालला असं सोडून जायचं मनात नव्हतं. पण इलाज नव्हता. आज सकाळीच मी व दिनकर आशा प्रेसला जायचं ठरलं होतं.

मी निघणार इतक्यात माझी नजर पलंगावरच्या पाकीटाकडे गेली. मृणालनं मघाशी कपाटातून काढलेलं पाकीट !

मी पाकीट उघडलं, आत रेल्वेची फर्स्टक्लासची दोन दोन निळी तिकीटं, रिझर्व्हेशनची पिवळी तिकीटं होती. मुंबई व्ही. टी. ते सिलीगुडी ! आणि हॉटेल पॅरडाईझ ह्या दार्जीलिंगच्या प्रसिद्ध हॉटेलचं पत्र...

"तुमचं पंधरा दिवसांचं रिझर्व्हेशन झालेलं आहे. अवश्य या !"

मृणाल अजून खाली मान घालून बसली होती. मी तिच्या केसावर हालकेच हात ठेवला आणि एकदम बांध फुटला. मृणाल मुसमूसून रडू लागली. तिला हुंदके आवरेनात !

मी तिला जवळ घेण्याचा प्रयत्न केला. पण ती हालली नाही. मी कॉटवर तिच्या शेजारी बसलो. पाठीवरून हात फिरवत म्हणालो––

"अग पण मला अगोदर कल्पना तरी द्यायचीस !"

मृणालनं माझ्या मांडीवर डोकं टेकलं, तिचे अश्रु माझ्या पँटवर पडत राहिले. ते पुसत मी म्हणालो, "सांगायचं नाहीस मला ?"

"मला तुम्हाला चकित करायचं होतं, मला वाटलं तुम्हाला आवडेल !"

"हो ग, पण अबी आणि मीनाचं काय, त्यांना नाही न्यायचं !"

"पुढच्या : आठवड्यापासून शाळांना सुट्या पडताहेत. मुलं सांगलीला जाणार आहेत."

"अग पण खर्चाचं झेपणार आहे का आपल्याला ! सध्या बँक बॅलन्स् दीडशे रुपये. सगळे पैसे नव्या मशीनमध्ये घालायला हवेत !"

"खर्चाची कशाला काळजी ?"

"कशी नको ? नाही म्हटलं तरी दीड एक हजार लागतील !"

"कशाला ? आणि जे काही लागतील ते मी पाहीन !

थोडीथोडकी नाही, गेली पंधरा वर्षं साठवतेय मी !"

मृणालनं मला कोणतीच पळवाट ठेवलेली नव्हती. तिचा हिरमोड मला करायचा नव्हता; पण आता मुंबई-बाहेर जाता येणं खरोखरच अशक्य होतं.

"ते खरं. पण रजा––!"

"नवीन मशीन घेण्यापूर्वी देवीलां जाऊन यायचं आहे म्हणून सांगा दिनकर भाऊजींना ! वाटलं तर आपण आठ दिवसात परतू. सहा, चार दिवसात देखील !"

"जाण्यायेण्यातच सगळे दिवस खर्ची पडायचे !"

"नाही, आपण कमी दिवस राहिलो तर तेवढे हॉटेलचे पैसे वाचतील. त्या पैशात विमानाने येऊ–!"

मी विचार करू लागलो. मुख्य म्हणजे दिनकर–! आणि इतरही बरेच ! मृणाल माझ्याकडे पहात होती. मोठाल्या डोळ्यात कारुण्य होतं, वेडी आशा होती. गेली पंधरा वर्षं जपलेलं दोघांचं एक स्वप्न होतं !










मी म्हणालो, "ठीक आहे, जाऊया.!"

"खरंच !"

"खरं !"

मृणालनं मला मिठी मारली. माझ्या खांद्यावर डोकं टेकून पुन्हा ती रडू लागली. आता शर्ट ओला झाला. कुंकवानं लाल झाला. तिची हनुवटी वर करून मी तिला विचारलं, "आता काय झालं ?"

काही नाही अशी मृणालनं मान हलवली आणि माझ्या डोळ्यांची, कपाळाची, नाकाची, ओठांची आवेगानं चुंबनं घेऊ लागली. ● ●

गाडीनं वळण घेतलं आणि गाडी मोकळ्या जागेत आली. इंजीनची कर्कश शीळ ऐकू आली. मृणालनं खिडकीची काच खाली केली आणि ती बाहेर डोकावू लागली.

जुन्या जामेन्यातलं इंजीन असलेली, खेळातली लुटुपुटूची वाटावी अशीच छोटीशी गाडी भक्भक् धूर काढत धावत होती.

रेल्वेचे रूळ आणि आमचा रस्ता एकाच रेषेत होता. मोटार आणि रेल्वे समांतर धावत होत्या.

छोटया छोटया खिडक्यातून गडद लाल, हिरवे, निळे पुलओव्हर्स घातलेली मुले, तरुण आमच्याकडे पाहून हात हालवत होते.

मी हात बाहेर काढला आणि त्यांना रुमाल फडकवला. सुट्टीवर निघालेली ती स्वच्छंदी मुले-माणसे एकदम "हो, हो" असे काही ओरडली.

मी दोन्ही बोटं तोंडात घालून शीटी मारली.

मृणाल टाळ्या वाजवत होती.

"किती छान, अय्या, किती मजेशीर–ती गाडी पहा, इंजीन पाहिलंत–!"

"हो पहातोय ना !"

"तो माणूस पहा इंजीनच्या बाहेर उभा आहे ! किती मजा वाटते नाही !"

आमचं लग्न होऊन पंधरा वर्षं उलटली, दोन मुलं आहेत आम्हाला, नवीन मशीन प्रसमध्ये यायचंय् – सगळ्याचा विसर पडला ! मृणालप्रमाणं मलाही !

मृणाल आता आमच्यापासून दूर होणाऱ्या रेल्वेकडे पहात होती. माझा हात धरून एकदम म्हणाली, "पुढल्या खेपी आपण रेल्वेनं जायचं दार्जीलिंगला!"

"हो, हो, !"

मृणाल हसत राहिली. त्या हसण्याबरोबर, दूर होणाऱ्या रेल्वेबरोबर माझ्या मनात कुठंतरी एक तार छेडली गेली, आणि तिच्या कंपनाने आणखीन्ही काही !

## [ २ ]

अनंत केशव गद्रे ह्या प्राण्याच्या बाबतीत काहीही घडण्याची शक्यता होती. तर्कशास्त्राचे सर्व नियम धाब्यावर बसतील असले अवचित ह्या माणसाचे वागणे ! इतरांनी अनेक तऱ्हेचे अंदाज वर्तवावेत, त्या सगळ्यांपेक्षा वेगळे हा अनंत केशव करून दाखवील. बिचाऱ्याचा स्वभाव तसा. आणि स्वभावासारखीच परिस्थिती! तेव्हा तो तरी काय करणार ?

असामान्य रूप, बुद्धिमत्ता, शक्ती, असलं काहीही ह्या प्राण्याला लाभलेलं नव्हतं, ही एका अर्थी देवाची कृपाच ! ह्या अनंत केशवचं वेगळेपण होतं त्याच्या डोक्याच्या आतल्या बाजूस परमेश्वरानं बसवलेल्या मेंदूत ! विचारच वेगळे ! ह्या वेगळेपणाचं कोडं इतरांना सुटलं नव्हतं, म्हणून हा माणूस एक विलक्षण प्राणी आहे असा लोकांचा समज झालेला ! एरवी अनंत केशव हा इतर चार तरुणांसारखाच !

बी. ए. चा निकाल आल्यावर आपण सेकंड क्लासमध्ये पास झालो म्हणजे बाहेर लोक नोकऱ्या घेऊन आपली वाट पहात आहेत असा जसा सर्वसामान्य तरुणांचा वेडा समज असतो तसाच अनंत केशवचा स्वतःबाबत होता.

पुढे पाच पन्नास ठिकाणी नोकरीसाठी अर्ज केल्यावर आणि दहा पंधरा इंटरव्ह्यू झाल्यावर बहुतेक तरुणांना स्वतःची नोकरीच्या बाजारातली किंमत कळून चुकते, तशीच ह्या अनंत केशवला समजून चुकली.

पण पुढे इतर तरुण जे सर्वसामान्यपणे करतात त्यापेक्षा अगदी वेगळेच ह्या नवजवानाने करून टाकले !

सैन्यात दाखल झाला ?

छे !

नवा धंदा काढला–?

तो काय वडिलांचा पैसा असला की कोणीही काढतं !

अनंत केशव गद्रे एका छापखान्यात कम्पॉझिटर होण्यासाठी सरळ ॲप्रेंटीस म्हणून कामास लागला.

श्री. केशवराव गद्रेंनी हे ऐकल्यावर कपाळाला हात लावला. त्यांच्या ओळखीने कोणत्या तरी ऑफिसात आपल्या चिरंजीवांना चिकटवून देण्याच्या खटपटीत ते होते. मोठ्या अधिकाऱ्याला भेटून, त्याचा हात ओला करून एक गुळमुळीत आश्वासन त्यांनी विकतही आणले होते.

**निवडणुकीची तोफ डागली !**

अगदी नाही म्हटले तरी एल्. डी. सी. म्हणून का होईना घरात दीडदोनशे रुपये आले असते. सारी धडपड वाया गेली.

चिरंजीवानी कुणाला न विचारता, न सांगता ही नोकरी पत्करून टाकली. पगार रुपये तीस ! निदान तूर्त तरी महागाई भत्ता वगैरे काही नाही. पुढे पाहू !–हे मालकाचे आश्वासन !

हे नाही ते वेड कोठून ह्या चिरंजीवांच्या डोक्यात शिरलं कुणालाच माहीत नव्हतं. चिरंजीवाला विचारलं असतं तर त्यांनी सांगितलं असतं–





दोन नोकऱ्या होत्या. एक ही, दुसरी वर्माशेलमध्ये ! मोठ्या साहेबांच्या प्यूनची !

हिशेब असा––मुंबईत उकाडा फार. घामानं जीव नकोसा होतो. साहेब काम करतात तो चवथा मजला पूर्ण एअर-कंडीशण्ड ! ऑफिसमध्ये साहेब फक्त चार तास येतात. ते बहुतेकांशी इंटरकॉमवर बोलतात. म्हणजे उगीच बोलावण्यासाठी कुठं येरझाऱ्या मारायला नकोत. भरपूर वेळ मोकळा ! बाहेर बसल्या बसल्या एम्. ए. चा अभ्यास सहज करता येईल. दरम्यान साहेबांच्याकडे येणाऱ्या मोठ्या लोकांशी चांगल्या ओळखी होतील ! एम्. ए. झाल्यावर चांगली नोकरी लागायला काय हरकत आहे ? पगार–एल्. डी. सी. पेक्षा नक्कीच अधिक ! बोनस. ह्याशिवाय पांढरेशुभ्र कपडे आणि त्यांची धुलाई फुकट ! (ही सवलत कोणत्या कारकुनाला मिळणार आहे ?)

दुसरी नोकरी कंपॉझीटरची !

––संबंध नेहमी पुस्तकाशी. वाचनाची हौस तर भागेल. लेखकांशी परिचय होईल पुढेमागे प्रेस काढू ! ह्या ओळखीवर प्रकाशकही होऊ. पण त्याकरिता आपण करायच्या धंद्याची चोख माहिती हवी. अगदी बारीक सारीक ! आताचा पगार; कमी आहे. असू दे ! माणसाची नजर नेहमी भविष्यकाळावर पाहिजे. आताच्या खडतर अंधारात उद्याचा उज्ज्वल भविष्यकाळ लपलेला असतो. (बहुतेक काव्य कुसुमाग्रजांचं ! ही ओळ – गर्जा जयजयकारमवली !) तेव्हा सतीचे वाण घेतल्याप्रमाणे सारी टीका सहन करून, चेहऱ्यावरचे दुर्दम्य हास्य कायम ठेऊन हे अनंत केशव रोज छापखान्यात खिळे जुळवणे शिकायला जाऊ लागले.

नोकरीच्या बाबतीत जो धक्का अनंतने लोकाना दिला तसाच धक्का त्याने लग्नाच्या बाबतीतही सगळ्यांना दिला.

वास्तविक ह्या नोकरी प्रकरणापासून सगळे अनंताला विचकूनच असत. त्याची आई जेव्हा नातेवाईकांना अथवा शेजारीपाजाऱ्यांना सांगे की मुलाला आता नोकरी लागली, लग्नाचं पाहिलं पाहिजे, तेव्हा ते तेव्हढ्यापुरतं हो हो करत आणि पुढं विसरून गेल्यासारखं दाखवत. कारण एकतर मुलाची नोकरी ही अशी, आणि दुसरं मुलगा हा असा ! त्याचा काही भरवंसा सांगता येण्याजोगा नाही.

नातेवाईक किंवा शेजारी जे सहज टाळू शकत ते अनंत केशवच्या वडिलांना टाळणं शक्य नव्हतं. एक दिवस काहीसे चिडूनच ते म्हणाले,––

"अग तुझ्या मुलाची काही खात्री देता येते का ? ही नोकरी–काय सांगायचं, पगार काय–रुपये तीस–!"

"आपल्या संसाराला सुरुवात झाली तेव्हा तुम्हालाही तेवढेच मिळत !"

"माझे आई, ते दिवस वेगळे होते !"

"अहो पण त्यालाही मिळतील चांगले पैसे !"

"पैशाचं सोड–! कुणी स्थळाबद्दल सांगितलं तर हा धड नीट पहायला तरी येईल का मुलीला ?"

"हो येईल की ! न यायला काय झालं?"

"स्वतंत्र आहे तो ! मिळवता झाला ना ! कुठं तरी लग्नाचंही जमवून ठेवलं असेल त्यानं एव्हांना ! मुलगी घेऊन तुझ्या माझ्या पाया पडायला येईल एक दिवस !"

"नाही हो. माझं ऐका. तुम्ही मुलगी तर पहा एखादी !"

केशवरावांनी स्थळ पाहिलं. सांगलीला त्यांच्या एका मित्राच्या वडिल बंधूंची मुलगी लग्नाची होती ! शिक्षण मॅट्रीक. घरकाम, शिवण टिपण करणारी, साधी सरळ मुलगी !

उलटया खोपडीच्या अनंताला ही काय पसंत पडणार ? पण अनंता नुसता तिला पाहून आला एवढंच नाही तर कसलेही आढेवेढे, अटी आणि मागण्या, न घालता त्यानं त्याचा होकार त्याच दिवशीच आपल्या आईला कळवून टाकला.

प्रेमविवाह काय सगळेच करतात आजकाल ! तो इतका कॉमन





अनुक्रमणिका





झालाय की त्यात काही चार्म उरलेला नाही. आणि प्रेमविवाहात पतिपत्नीची आधीच ओळख असते. एकमेकांच्या आवडीनिवडी अगोदरच माहिती असतात. तडजोडीना लग्नापूर्वीच सुरुवात झालेली असते. अपरिचित मुलीशी लग्न होण्यात एक 'थ्रिल' आहे. पत्त्याचा पान न पहाता खेळायचा एक खेळ असतो. केवढी मौज असते त्या डावात ! प्रेमविवाहात आपल्याला सगळीच पानं माहिती ! मग त्यात उत्कंठा, आशा, प्रतीक्षा, अनपेक्षित आनंद, आश्चर्य राहिली कोठे ! -इति अनंत केशव!

—अनंत केशव गद्रेचं लग्न संध्याकाळी गिरगावातल्या वनमाळी हॉलमध्ये झालं. तारीख होती १० मे ! पगाराचा दिवस! अनंताचे मालक लग्नाला आले होते. जाताना एक पाकीट देऊन गेले.

पानसुपारीनंतर घरी पाकीट फोडताना अनंता म्हणाला, "मालक पगारच आहेर म्हणून देऊन गेलेले दिसतात!"

आणि आत खरोखरच पत्र होतं— एप्रिल महिन्याचा पगार—पत्राला टाचणीनं शंभराच्या दोन नोटा लावलेल्या होत्या !

अनंताची आई हरकून गेली. तिनं पत्र आणि त्या नोटा तशाच अनंताच्या वडिलांच्या समोर धरल्या. वडिल काय पुटपुटले ऐकू आलं नाही, पण त्यांनी आकाशाकडे पाहून नमस्कार केला, तेवढाच दिसला.

आजवर अगदी नियमित गणेशमंदिरात दर्शनाला जाणारी आणि एकही संकष्टी न चुकवलेली सांगलीची मुलगी गद्रेंची सून होऊन गिरगावातल्या डबलरुमच्या सासरी रहायला आली. हुंड्याविड्याची अट घालून आपल्या वडिलांची अडवणूक न करणारा एक तरुण एवढीच तिची अनंताशी ओळख ! पण फार दिवस जावे लागले नाहीत. अनंताच्या स्वभावाची एक झलक लग्नानंतर आठ दिवसात तिला मिळाली.

"कार्य व्यवस्थित पार पडलं, आता एकदा गणपतिपुळ्याला जाऊन गणेशाचं दर्शन घेऊन या जोडीनं !"

अनंताच्या आईनं सांगितलं, तशी सूनबाई मनोमनी हरकली. गणेश तर तिचं परम दैवत. सांगलीचा दर्शनाचा नियम इथं मोडला. पण गणपतिपुळ्याला आजवर जायला जमलं नव्हतं ते आता शक्य होतंय् !

स्वच्छ, सुंदर समुद्र, त्याच्या वाळूतच बांधलेलं गणेशाचं देऊळ; आत लालभडक शेंदूर माखलेली मंगलमूर्ती...सारं काही कल्पनेनंच तिच्या नजरेसमोर उभं राहिलं.

रत्नागिरीला कोल्हापूरवरून जायचं होतं. लग्नाला येऊ न शकलेल्या अनंताच्या मामांचं आग्रहाचं आमंत्रण होतं. कोल्हापूरहून सांगली केवळ तीस मैलावर. दोन तासाचा प्रवास दादा आई भेटायला येतील. शक्य झालं तर आईलाही गणपतिपुळ्याला नेऊ ! अनंता 'नाही' म्हणायचा नाही.

विचारात दिवस कसा सांपडला सूनबाईला समजलं नाही. रात्र झाली. सगळ्यांची जेवणं झाली. अनंता उशीरा येतो. छापखान्यात ओव्हरटाईम चाल-लाय ! सासूबाई म्हणतात, "जेवून घे!" "भूकही लागलीय कडकडून! पण नवऱ्या-अगोदर कसं जेवायचं ? सगळी काय म्हणतील !

किती वाट पहायची ! रिझर्व्हेशन मिळालं काय ? गाड्यांना कोण गर्दी असते आजकाल !... जनतानंच निघायचं ना ! सकाळी सकाळी कोल्हापूरला पोहोचू. मला अंबाबाईच्या दर्शनालाही जायचं आहे.....आणि कोल्हापूरात मुक्काम किती...पत्र पाठवू का दादांना...भेटून जा म्हणून !

प्रश्न लाख तयार आहेत पण ओठावर आले पाहिजेत ना ! खालच्या मानेनं सूनबाई अनंताला जेवायला वाढत होती. दिवसभर, इतक्या उशिरापर्यंत अनंताचा चेहरा प्रसन्न होता. हसरा होता. डोक्यात काहीतरी विचार चाळल्यासारखा !

बाहेर निजानीज झाली होती. तिनं हिंमत करून शेवटी विचारलं, "कधीचं मिळालं रिझर्व्हेशन ?"

पोळी खात खात अनंतानं विचारलं, "तुझ्याकडे गरम कपडे आहेत ?"

"एक स्वेटर आहे !"

"गरम पांघरूण ?"

"अुं. हूं. पण रत्नागिरीला ह्या दिवसात थंडी नसते !"

"आपण रत्नागिरीला कुठं चाललोय !"

"मग–!"

"दार्जिलिंगला !"

"कुठं ?"

"दार्जिलिंगला !"

"ते हिमालयात आहे ते ?"

"मग काय कोकणात आहे !" अनंता हंसला.

"काय झालं, स्टेशनवर गेलो कोल्हा-पूरच्या रिझर्व्हेशनसाठी, तिथं एक पोस्टर पाहिलं– Visit Darjeeling–दोन लामा आपले तुताऱ्या वाजवत आहेत. मागं कांचनगंगा ! बर्फानं शिखरं सफेद झालेली! तुला आवडेल दार्जिलिंगला यायला ?"

सांगलीच्या पोरीनं मुंबईला येताना पहिल्यांदा खंडाळा घाट पाहिलेला. पूर्वी शाळेची ट्रीप पन्हाळ्याला गेली होती, पण तिला जायला नव्हतं मिळालं. दार्जिलिंग ... हिमाच्छादीत शिखरं...लामा तुताऱ्या ...!

कानावर विश्वासच बसत नाही.

"रिझर्व्हेशन मिळालं ?"

"मिळवलं. ओळखी असल्या की सारं शक्य होतं !"

"पैसे ?"

"दिनूनं उसने दिलेत ! पण ते जाऊ दे ! तू येशील ना माझ्याबरोबर !"

"आणि घरी काय सांगायचं ? सासूबाई–!"

"मी सांगेन ! तू ती काळजी करू नकोस. हे पहा आपण अगोदर बोललो तर सगळेच ओरडतील. जाण्यातला 'चार्म' निघून जाईल ! आपण पत्र टाकू पहिल्या स्टेशनवरून !"

"म्हणजे पळून जायचं की !"

"हो, पण लग्नानंतर. तू येशील ना?"

"आणि गणेशाच्या दर्शनाचं काय झालं ?"

"हे गणेश कोणाचे चिरंजीव ?"

"शंकराचे ! शंकर पार्वतीचे !"

"ते रहातात कुठं?"

"हिमालयात !"

"झालं तर. तिकडं भेटतील ते आप-ल्याला. मी आता शेवटचं विचारतो आहे, येशील !"

"येईन की ! न यायला काय झालं?"

• •

आणि दोन तासात सिलीगुडी येईल... तरीही अद्याप खरंच वाटत नाही. मुंबई निदान हजार मैल मागं पडली. आपण खरंच दार्जिलिंगला चाललोय. पार्व-तीच्या माहेरी ! माहेर हे नेहमीच सुरेख असतं. पार्वतीचं माहेर म्हणजे तर हिमालय ! ह्या विलक्षण माणसामुळे आपल्याला हिमालय पहायला मिळतोय... मला तर त्या दार्जिलिंगपेक्षा हिमालयाचंच आकर्षण अधिक आहे.

लग्न होऊन आठदहा दिवस उलटले तरी काहीशा अपरिचित राहिलेल्या ह्या तरुणाची ओळख प्रवासाच्या ह्या दोन दिवसात केवढी दाट झाली. ओळख कशी म्हणायची! आपल्या नवऱ्याच्या प्रेमातच पडले आहे मी !

लखनौला केवढा उकाडा. अंगाची लाही-लाही होत होती. गरम उन्हाच्या झळा मारत होत्या. वाटलं नको हा प्रवास !

अनंतानं स्टेशनच्या बाहेरून वाळ्याचे दोन पंखे आणले. एक छोटा पडदा आणला. रेल्वेच्या खिडकीला लटकवून दिला. त्यावर पाण्याचे सपकारे मारले तसा वाळ्याचा गंध त्या डब्यात पसरला. त्या वासानं तो थर्डक्लासचा डबा थर्ड-क्लासचा राहिलाच नाही. मधुचंद्राला निघालेल्या नुकत्या लग्न झालेल्या प्रेमी दांपत्याचा तो 'कुपे' झाला !

कल्पकता कौतुक करण्याजोगी खरी, पण त्यामागच्या भावनांची तिला मोठी अपूर्वाही वाटली ! आठ बारा आण्याचा प्रश्न, पण तिला सारखी तहान लागते म्हणून त्यानं मातीचा खुजा आणला. अरुंद तोंडाचा, लाल मातीचा ! नवा असल्यानं त्याला मातीचा वास येई, पण पाणी थंडगार व्हायचं ! तहान भागायची !

तिच्या साध्याभोळ्या प्रश्नांची त्याला गम्मत वाटायची ! सहज तिकीट घ्यावं आणि लाखाची लॉटरी लागावी तशी बायको आपल्याला लाभली. खिडकीत रेलून ती बाहेर पहात बसते तेव्हा तिचे लांबलचक केस वाऱ्याने हालताना किती सुरेख दिसतात. वाटतं त्यातून हालकेच बोटं फिरवावीत. खरंच हा फर्स्टक्लासचा कुपे हवा होता. कितीतरी गोष्टी मनातल्या मनातच ठेवाव्या लागतात; पण असूं दे. स्वतःचा प्रेस काढू तेव्हा कुपेनंही प्रवास करू. असेच आम्ही दोघे दार्जिलिंगला येऊ !

सिलीगुडी स्टेशनवर दार्जिलिंगच्या निघालेल्या प्रवाशांपेक्षा ऑलिव्ह ग्रीन कपड्यातल्या सैनिकांचीच गर्दी उडालेली होती. अधिकाऱ्यांच्या काळ्या अवजड










ट्रंका, सैनिकांच्या कॅन्व्हासच्या किटबॅग्ज, लोखंडी पेटचा, ओळीनं ठेवलेल्या बंदुका, त्यांची बायोनेटं...स्टेशनला 'आर्मी कॅम्प'चं स्वरूप आलेलं होतं. त्या पार्श्वभूमीवर आठदहा दिवसांपूर्वी लग्न झालेलं आणि गेल्या काही तासांपूर्वी एकमेकांच्या प्रेमात पडलेलं हे जोडपं सिनेमातल्या दृश्यासारखं काहीसं स्वप्नसृष्टीतलं वाटत होतं.

ट्रेनला अद्याप अवकाश होता. पण सिलीगुडीहून कितीतरी टॅक्सी दार्जिलिंगला प्रवाशांना घेऊन जातात. टॅक्सीचा दर रेल्वे तिकीटाएवढाच! कदाचित थोडा जास्त ! पण भरकन पोहोचता येतं.

अनंताला एका स्टेशन वॅगनमध्ये जागा मिळाली. दोघं मधल्या सीटवर सामानांच्या गर्दीत दाटीदाटीने बसली. अशा वेळी जागेची अडचण हवीच असते. खेटून बसायला कारण मिळतं !!

वळणावळणाला गाडी एका बाजूवर कलंडल्यासारखी होई आणि अनंता तिच्या अंगावर रेलला जाई. तिला मोठा संकोच वाटे. गाडीत माणसं आहेत ना ! वाऱ्यानं तिचा पदर फडफडत त्याच्या चेहऱ्यावर येई. त्या पदरातून विजेचा प्रवाह चालू असल्यासारखा तो क्षणभरं बधीर होऊन जाई. तिच्या लांबसडक केसांची वेणी आता त्याच्या मांडीवर पडली होती. तिचे पेड सोडवायचा मोह त्याला आवरणं कठीण झालं.

तो म्हणाला, "लिनी, आपण पोहोचे तो दुपार होईल !"

हो दुपार होईलच! चारपाच तासांचा प्रवास आहे.

"मग प्रथम जेवण करू !"

दुपारी माणसं दुसरं काय करतात ? जेवलं पाहिजेच की—!

"आणि लिनी..."

हे 'लिनी' काय ? कुठलं काढलं नाव! कधी आजवर ऐकलं नाही. विचारू काय?

"ए तुझं लक्ष नाही. मी काय सांगत होतो लिनी—!"

खरंच माझं लक्ष नाही. काही वेळा शब्दांना अर्थ असतो का ? पोहोचे तो दुपार होईल !

बरं मग ?

मग जेऊया !

हो जेवायलाच हवं !

हे संभाषण! ह्यात काय उत्तरं द्यायची! मला आपलं नुसतं ऐकत रहावंसं वाटतं. तुम्ही बोला. मी ऐकते; पण हे ह्यांच्या लक्षात यायचं नाही. सगळं शब्दात सांगायला हवं.

"तुझी वेणी खाली लोळतेय लिनी!"

"अहो हे 'लिनी' काय म्हणताय्!"

"तुझं नाव !"

"कधी ठेवलं?"

"आताच, गाडीत बसलो ना तेव्हा ! आवडलं ?"

"लिनी म्हणजे काय ?"

"काहीच नाही !"

"काहीच नाही ?"

"म्हणजे नुसत्या 'लिनी' ह्या शब्दाला अर्थ नाही ! पण मी म्हणतो तेव्हा लिनी एक लांब केसांची, काळ्या डोळ्यांची, गणपतीचं दर्शन न चुकवणारी, एक सुरेख सुंदर..."

"पुरे पुरे !"

"तूच अर्थ विचारलास. आमच्या वडिलांनी तुझं नाव मृणालिनी ठेवलं आहे. केवढं मोठं नाव...मालगाडीसारखं. मी लिनी केलं! आवडलं?"

गाडी आता चढणीला लागलीय्. गिअर बदलल्यामुळे इन्जीनचा आवाज मोठा झालाय्. त्यामुळे मोठ्यांदा बोलावं लागतंय् ! बोललंच पाहिजे का पण ते बोलतायत. मला बरं वाटतंय् ! त्यामागची मला सुखवण्याची भावना मला गुदगुल्या करतेय. कोण आपल्याला एवढं महत्त्व देतंय्. आपली आवड निवड प्रत्येक खेपी विचारतंय्..खरंच खूप खूप बरं वाटतंय् !

हवेतला गारठा वाढलाय्. हिंदीत कसं सांगायचं, 'जरा काच बर करा' म्हणून ! तो चपट्या नाकाचा गोरापान ड्रायव्हर स्वतःच्या तंद्रीतच गाडी चालवतोय्. त्यांच्या अंगात नुसता शर्ट आहे. कोट, कॉटनचा, खाकी, काढून त्यानं सीटवर टाकलाय्!

"थंडी वाजतेय् नाही !"

"तर काय?" अनंतानं तत्परतेनं बॅगेतून मफलर काढला.

"गळ्याभोवती गुंडाळ लिनी!"

हे शेवटचं लिनी उगीचच ! मी मफलर







गुंडाळला ! माझे गरम कपडे ह्यांनी मित्रांकडून त्यांच्या बहिणींचे पैदा केलेत. ते मला नीटसे होत नाहीत. ही अंगातली केप कुठं नीट बसतेयं !

"तुमचा स्वेटर?"

"बॅगेत राहिला."

"आता बॅग तर मागं सामानाखाली गेली."

"जाऊ दे. टॅक्सी थांबली की काढून घेऊ ! तोवर—!"

अनंतानं ड्रायव्हरचा सीटवरचा खाकी कोट उचलला.

"आपको चाहिए क्या ?"

"क्या?" ड्रायव्हरनं पुढं पहात विचारलं.

"आपका कोट ?"

"थंडी कहाँ है ?" ड्रायव्हर म्हणाला.

"तो मैं लेता हूँ !" अनंतानं अंगात चढवला. लिनीला केप मोठी होत होती त्यापेक्षा अनंताला हा कोट मोठा झाला. लिनीला हसू आलं.

"कसा दिसतो मी ?"

काय उत्तर द्यायचं !

"क्लीनरसारखा किनई!" अनंता हसला.

लिनी हसली.

बाहेर आता धुकं पडलं होतं. वाऱ्यानं हे धुक्याचे ढग खाली येत आजुबाजूची सारी सृष्टी झाकून टाकत. मोटारीऐवजी विमानातून प्रवास चालू आहे असं वाटे. क्षणार्धात मधूनच एखाद्या वळणावर धुकं अदृश्य होई. खाली खोलवर भातशेतीचे हिरवे पिवळे पट्टे दिसत. उतरणीवर खेळात मांडल्यासारखी छोटी छोटी घरे दिसत. डोळे भरून दृश्य पाहून घेण्या-पूर्वीच गाडी वळण घेई किंवा धुक्यात परत सगळं अदृश्य होऊन जाई.

एकदम गाडीची शिटी वाजली. त्या वातावरणात रेल्वेची शिटीही नेहमीसारखी कर्कश वाटली नाही. रस्ता आणि रेल्वेचे रूळ समांतर रेषेत आले. लिनीनं काच खाली केली आणि बाहेर डोकावून पहात ती ओरडली,

"अहो ती पहा, ती पहा केवढी छोटीशी गाडी !"

सामान रचल्याने दुसऱ्या बाजूची खिडकी जवळ जवळ बंद झाली होती. बाहेर पहाण्या-साठी अनंता तिच्या अंगावर झुकला. त्याचा चेहरा तिच्या गालाजवळ आला. हे त्याच्या हातून अभावितपणे घडले काय ? तिच्या शरीराचा कणन्कण मोहरून उठला.

गाडीतले प्रवासी मोटारीकडे पाहून हात दाखवत होते. ओरडत होते.

अनंतानं दोन्ही बोटं तोंडात घातली आणि जोराची शीळ घातली. रेल्वेतल्या मुलांनी हुल्ला केला. मागच्या सीटवरचे बंगालीही रेल्वेकडे पाहून हुर्यो करू लागले. ड्रायव्हर काही तरी गुणगुणत आपल्याच तंद्रीत चालला होता.

समांतर रस्ता संपला. रेल्वे आणि मोटार एकमेकांपासून दूर झाल्या. वळणाआड रेल्वे गेली आणि दिसेनाशी झाली.

अनंता हसला.

लिनीही हसली.

चेहऱ्यावरचे पावसाचे तुषार पुसून अनंतानं रुमाल लिनीकडे दिला. त्या रुमा-लानं स्वतःचा चेहरा पुसायचा तिला संकोच वाटला. जणू त्या रुमालाच्या रूपानं त्याचेच हात तिच्या गालाना स्पर्श करीत होते.

रेल्वेचे फाटक ओलांडून एका हॉटेल-समोर गाडी थांबली.

स्टेशनवरचा बोर्ड तेथूनही दिसत होता. अनंता आणि लिनीनं मोठ्यांदा नाव वाचले, "करशॉंग."

मेनू कार्ड तिच्या पुढे टाकत अनंतानं विचारलं,

"काय खाणार ?"

मला काय समजतं त्यातलं.....! तुम्हीच ठरवा ना !

"बरं, गरम चहा घेऊ. चहाबरोबर चीज पकोडे खाल्लेस कधी ?"

लिनीनं मान हालवली. नावच पहि-ल्यांदा ऐकत होती ती !

"मीही एकदाच खाल्लेत. मला आवडले. तुलाही आवडतील, मागवू या ?"

हे काय, प्रत्येक खेपी परवानगी विचारली पाहिजे !

"वेटर दो गरम चाय और चार प्लेट चीज पकोडे !"

"कितना प्लेट !"

"चार प्लेट. एक मेमसाबके लिए. तीन मेरे लिए !"

वेटर निघून गेला.

अनंता आणि लिनी दोघे हसली !

[क्रमशः]

**झेप तर घेतली !**




**लोकसभेची निवडणूक जाहीर झाली !**

# मराठी रंगभूमीवरील तपस्वी, मनस्वी महर्षि नटश्रेष्ठ केशवराव दाते



—लक्ष्मीदास बोरकर

हे नाव घेताक्षणी आपल्या नजरेसमोर एक स्वयंभू व्यक्तिमत्व उभं राहातं. 'सवती मत्सर' नाटकातला एकवचनी 'राम' दृष्टीसमोर साकार होतो. 'वेवंदशाही'मधील 'गणोजी शिर्के' आठवतो. 'सत्वपरीक्षा' नाटकातला 'हरिश्चंद्र' नजरेसमोर येतो. 'कीचकवध' नाटकातला धष्टपुष्ट 'भीम' मुठी आवळीत खडा होतो. 'विचित्र लीला' नाटकातला चमत्कारिक व विचित्र पेहराव केलेला 'विचित्र' हजेरी लावून जातो. 'आंवळ्यांची शाळा'मधला 'मनोहर' दर्शन घडवितो.

श्री. दाते हे अभिजात रंगभूमी कलाकार असले तरी त्यांनी सिनेमासृष्टीही गाजविली आहे. 'कुंकु' या प्रभातनिर्मित चित्रपटातील अल्पवयी कुमारिकेशी लग्न करून तारुण्याचं सोंग आणू पहाणाऱ्या थेरड्या 'काकासाहेबां'ची त्यांची भूमिका अविस्मरणीय आहे. 'कुंकु'मधला 'काका' ही एक अमर भूमिका आहे. 'शेजारी' या प्रभातनिर्मित आणखी एका चित्रपटातील वृद्धिवळाच्या डावात देहभान हरपून जाणाऱ्या 'पाटलां'ची त्यांची भूमिका अजोड आहे. 'संत तुळशीदास'मधील खलनायक 'वटेश्वर शास्त्री', 'अमृतमंथन'-मधील 'राजगुरु' वगैरे त्यांच्या भूमिका श्री. दाते यांच्या अष्टपैलू गुणाचे साक्षीदार आहेत.

आज मराठी रंगभूमीवर विद्यमान असलेल्या जुन्या पिढीतील कर्तृत्ववान कलाकारात श्री. केशवराव दाते हे अग्रगण्य आहेत. मराठी रसिकांनी त्यांना स्वयंस्फूर्तीने 'नटवर्य' ही पदवी वहाल केली आहे. श्री. दाते यांची नाट्यतपस्या जशी दीर्घकालीन तशीच ती बहुविध व गुणसंपन्न अशी आहे. त्यांचे रंगभूमीवरील कार्य लोकप्रिय व मौलिक आहे. पाच तपाच्या काळात त्यांनी भिन्न भिन्न प्रकारच्या किती तरी भूमिका रंगभूमीवर साकार केल्या. असंख्य नवोदित नाटककारांना प्रयोग तंत्राचे दर्शन घडविले. अनेक उदयोन्मुख कलाकारांना अभिनयकलेचे व रंगाविष्काराच्या तंत्राचे धडे दिले. नव्या जमान्यातील दिग्दर्शकांना मार्गदर्शन केले.



# यांची अनुभव गाथा



सौजन्य, विनय व सहकार्य तत्परता हे त्यांच्या अंगचे नैसर्गिक गुण. या गुणांमुळे ते सर्वांचे आवडते आहेत. सौंदर्यासक्ती व संयम यांचा त्यांच्या स्वभावात सुरेख संगम झाला आहे. त्यामुळे बहुतेक कलावंतांच्या जीवनात क्वचित् आढळून येणारी संगती व सुसूत्रता त्यांच्या वैयक्तिक व व्यावहारिक जीवनात उठावदारपणे साधलेली आहे.

श्री. दाते यांनी मराठी रंगभूमीवरील स्थित्यंतरांना सांधणारा दुवा या नात्याने मोलाचे कार्य पार पाडलेले आहे. महाराष्ट्र नाटक मंडळीत असताना श्री. दाते यांनी नाट्यलेखन व प्रयोगतंत्र यासंबंधात जेवढे नव्या दृष्टीचे प्रयोग करून पाहिले तेवढे अन्य कुणीही केलेले दिसत नाहीत. 'विचित्र लीले'पासून ते 'सरला देवी'पर्यंत त्यांच्या या प्रयत्नांची अखंड परंपरा आढळून येते. त्यांच्या मुळाशी एक प्रकारची पुरोगामी वृत्ती होती. नावीन्याची धडपड होती. जिज्ञासा व कुतुहल वृद्धी होती. त्यांचे प्रयत्न व्यावहारिकदृष्ट्या






अनुक्रमणिका



**मराठी रंगभूमीचे वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व तपोवृध्द अभिजात कलाकार श्री. केशवराव त्र्यंबक दाते यांनी उभी हयात रंगभूमीची सेवा करण्यात वेचली. या प्रदीर्घ जीवनात त्यांनी अनेक प्रयोग करून पाहिले, ज्ञानाचे प्रचंड भांडार गोळा केलं. त्यांच्या कलेचा, त्यांच्या अनुभवांचा, त्यांच्या ज्ञानाचा भावी पिढीला वारसा लाभावा या उद्देशाने श्री. दाते यांच्या अनुभवाचे भांडार आम्ही मराठी वाचकांसमोर खुले करीत आहोत. श्री. लक्ष्मीदास बोरकर यांनी सादर केलेली श्री. दाते यांच्याच शब्दातील ही त्यांची अनुभव गाथा . . . .**

जरी असफल ठरले तरी नाटयाच्या प्रगतीच्या दृष्टीने ते अत्यंत उपयुक्त ठरले.

### नव्याचा तत्परतेने अंगीकार

जुन्या परंपरेच्या परिसरात नवे नवे प्रयोग यशस्वी करण्याचा श्री. दाते यांचा मनोदय सफल झाला नाही. त्यांना आपली संस्था बंद करावी लागली; परंतु, त्या परिस्थितीत स्वतःच्या अगर संस्थेच्या नावलौकिकाच्या व प्रतिष्ठेच्या भ्रामक अभिमानाला बळी न पडता त्यांनी नाटचविषयक नवी दृष्टी असलेल्या अप्रसिद्ध पण उदयोन्मुख अशा तरुणांशी बरोबरीच्या नात्याने समान भूमिकेवरून सहकार्य करण्याची तयारी दाखविली. श्री. दाते यांच्या स्वभावातील हे प्रशंसनीय वैशिष्टच.

स्वतःच्या बळावर व कर्तबगारीवर प्रतिष्ठा पावलेल्या व्यक्तीला भरभराटीच्या काळात ही गोष्ट करून दाखविणे कठीण नसते. परंतु, पडत्या काळात ते करून दाखविणे महाकठीण असते. त्यासाठी दुर्दम्य आत्मविश्वास, प्रखर तत्वनिष्ठा व निस्पृह अलिप्तता या गुणांची नितांत आवश्यकता असते. श्री. दाते यांनी 'नाटचमन्वंतर' या नाटचसंस्थेच्या संस्थापकात सहभागी होऊन आपल्या अंगी हे गुण असल्याचे सिद्ध करून दाखविले. म्हणूनच श्री. दाते यांचे नाटचजीवन प्रवाही राहिले, प्रगतीपर ठरले. त्यांच्या हातून नवीन परंपरेची प्रतिष्ठापना झाली. महाराष्ट्र नाटक मंडळीत सहज स्फूर्तीने सुरू केलेले नावीन्याचे प्रयोग नाटचमन्वंतराच्या क्षेत्रात जाणतेपणाने पडताळून पहाण्यास त्यांना अवसर मिळाला. त्यांच्या अनुभवाला व कलेला शास्त्रीय विचारसरणीची, तर्कशुद्ध उपपत्तीची जोड लाभली.

जुनी रंगभूमी व नवी रंगभूमी यांच्यात केवळ अभिव्यक्तीच्या तंत्राचाच फरक नाही, तर त्यांच्या व्यवसायपद्धती भिन्न, त्यांचा सामाजिक दृष्टीकोन निराळा, कलाविषयक तत्त्वज्ञान वेगळे. जीवनविषयक दृष्टीकोनातील मूलभूत फरकामुळे जुन्या व नव्या रंगभूमीवरील संस्यांच्या संघटना पद्धतीत अंतर पडणे अपरिहार्य होते. जुन्या रंगभूमीच्या दृष्टीने नाटचकला हा एक धंदा होता. नव्या रंगभूमीच्या दृष्टीने ते एक सामाजिक कार्य आहे. श्री. दाते हे त्या जुन्या कल्पनेचा वारसा सोडून या नव्या निष्ठेच्या क्षेत्रात शिरले. यावरूनच त्यांच्यातील पुरोगामित्व दिसून येते. श्री. दाते यांनी नव्या रंगभूमीच्या पुरस्कर्त्यांबरोबर सहकार्य करण्याची तयारी दर्शविली यावरून त्यांचे धैर्य व नाटचकलेविषयीची खरीखुरी तळमळ दृष्टोत्पत्तीस आली. जुने संस्कार विसरून नव्या अपेक्षांशी समरस होण्याचा प्रयत्न करताना त्यांना किती तरी अडचणींना तोंड द्यावे लागले असेल. त्यांना किती त्रास झाला असेल, त्यांच्या मनाचा किती कोंडमारा झाला असेल याची केवळ कल्पना केलेली बरी. या सर्व दिव्यातून ते सहीसलामत बाहेर पडले. या त्यांच्या सहकार्य प्रयोगापासून त्यांचा किंचित फायदा झाला असेल ते त्यांचे त्यांनाच ठाऊक; परंतु रंगभूमीचा मात्र निश्चितपणे फायदा झाला आहे. आज जुन्या-नव्या रंगभूमीचा वाद हा वैमनस्याचा विषय उरलेला नाही. एकमेकांकडे संशयाने अगर उपेक्षा बुद्धीने पाहाण्याची वृत्ती उभय पक्षात राहिलेली नाही. सवतेसुभे मोडून टाकावेत, समान भूमिकेवरून, सहकार्याच्या भूमिकेवरून रंगभूमीचे पुनरुज्जीवन करण्यासाठी प्रयत्न करण्याची तळमळ दोन्ही पक्षात निर्माण झाली आहे. या परिवर्तनाचे सारे श्रेय श्री. दाते यांचे एकटयाचे आहे असे म्हणणे कदाचित अतिशयोक्तीचे ठरेल; परंतु त्यात त्यांचा सिंहाचा वाटा आहे यात शंकाच नाही.

### तरुणांनाही लाजविणारा दुर्दम्य उत्साह

आज श्री. दाते नाबाद ८२ आहेत. त्यांचे शरीर थकले असले तरी त्यांचा नाटचव्यासंग चिरतरुण आहे. रंगभूमीच्या माध्यमाच्याद्वारे समाजाची यथाशक्ती सेवा करण्याचा त्यांचा उत्साह तरुणांनाही लाजविणारा आहे. त्यांना रंगभूमीच्या उत्कर्षाचा ध्यास लागून राहिला आहे. अत्याधुनिक प्रयोगांविषयी त्यांना आस्था वाटते. पूर्वीइतक्याच उत्साहाने ते त्यात रस घेतात. तरुणांना मार्गदर्शन करण्यासाठी थकलेल्या देहाची तमा न बाळगता ते पुढे सरसावतात.

श्री. दाते यांच्या जीवनावर 'सत्त्वपरीक्षा' या नाटकातील राजा हरिश्चंद्राच्या आदर्श जीवनाची छाप पडली आहे. 'सत्त्वपरीक्षा' नाटकात राजा हरिश्चंद्र गुलामाचे जीवन जगत असताना म्हणतो, 'किंमतीपेक्षा अधिक कष्ट धन्याच्या घरी केले असे सहजोद्गार माझ्या मालकाच्या तोंडून निघोत हीच माझी इच्छा ' नटवर्य दाते यांची मनोधारणादेखील तशीच आहे. ते म्हणतात, " रंगभूमीवरील माझ्या कामगिरीबद्दल प्रेक्षकांकडून अशीच यशाची पावती मिळो, एवढीच माझी अपेक्षा आहे."

श्री. दाते यांच्या आचार-विचारांवरसुद्धा हरिश्चंद्राच्या आदर्शाची पावले उमटलेली दिसतात. श्री. दाते म्हणतात, " रंगभूमीच्या या पवित्र व्यासपीठाचे पावित्र्य निष्कलंक ठेवण्यासाठी प्रेक्षकांनी सतत डोळयात तेल घालून जपले पाहिजे. सतत जागता पहारा ठेवला पाहिजे. तुमच्या आमच्या सर्वांच्या सदभिरुचीच्या बंधनात ही आपली रंगभूमी सतत रावली पाहिजे. उथळपणाचा, थिल्लरपणाचा, बाष्कळपणाचा, चवचाल चाळयांचा वापर या रंगभूमीच्या परिसरात कधी होणार नाही अशी आपण सतत दक्षता बाळगली पाहिजे."








श्री. दाते यांची वालपणीची एक तेजस्वी स्मृती जागी झाली. ते म्हणाले, "मी सात वर्षांचा असेन त्यावेळी. कोकणात दशावताराचे खेळ करीत. पहिल्या प्रथमच मी नाटकात भाग घेतला. माझ्या वाटयाला आली गणपतीची भूमिका. पाठ करण्याची चार वाक्ये होती; परंतु त्या भूमिकेने मला इतके भारून टाकले की चार दिवस मी वेहोष आवेशात ती वाक्ये स्वतःशीच पुटपुटत असे. त्यातल्या त्यात 'वालका सूत्रधारा, तुझे कार्य निर्विघ्नपणे तडीस जावो' हे वाक्य तर मी इतक्या धीमेपणाने म्हणत असे की मला वाटे, या वरप्रदानावर मवंध नाटकाची सिद्धी अवलंबून आहे."

या नटवर्यावर गणपतीची कृपा आहे. त्यांच्या जीवनाची नांदी मंगलमूर्तीने केली आहे. अगदी लहान वयात श्री. दाते यांनी रंगभूमीवर प्रवेश केला. एका गरीव भिक्षुकाचा हा मुलगा. शिक्षण जेमतेम इंग्रजी पाचवीपर्यंत झालेले. अधिक शिक्षण घेण्याची इच्छा होती; परंतु माधुकरी मागून अगर वार लावून अभ्यास करणे त्यांच्या स्वाभिमानी वृत्तीला मानवेना. अशा स्थितीत काही तरी करायचे म्हणून ते एका वैद्याकडे राहिले. परंतु तेथे विपरीत अनुभव आल्याने घरातून पलायन करून ते मुंवईला आले. मुंवईला आल्यावर ते कम्पाउंडर म्हणून कामास लागले. त्यात स्थैर्य आल्यावर जरा निराळे व वैचित्र्यपूर्ण क्षेत्र दृष्टीसमोर आले म्हणून त्यांनी नाटयव्यवसायात प्रवेश केला.

## नाटक कंपनीच्या बिऱ्हाडी प्रवेश

श्री. दाते यांनी जीवनातलं आपले पहिले पाऊल नाटक कंपनीच्या विऱ्हाडात ठेवलं ते वयाच्या सोळाव्या-सतराव्या वर्षी. यावद्दल श्री. दाते म्हणतात, "मी १९०७ साली म्हणजे ६३ वर्षांपूर्वी नाटक मंडळीचा उंवरठा ओलांडला. त्यावेळीं मी काही वेकार नव्हतो. माझ्या पोटापाण्याचा व्यवसाय ठीक चालला होता. तो सामान्यतः प्रतिष्ठीत होता; पण त्याचवरोवर मुंवईच्या क्लवांमधून माझीं नाटयकलेचीही थोडीफार तोंडओळख झाली होती. त्या काळात नुकतीच कुठं नाटकवाल्यांना थोडीवहुत प्रतिष्ठा येऊ लागली होती. त्याच्या आधी सुमारे पंचवीस वर्षांपूर्वीच्या काळात डोकावलं तर नाटकवाला म्हणजे सगळ्या समाजावरून ओवाळून टाकलेला उताराच समजला जात असे. इतर प्रतिष्ठित व्यवसायात उमेदवारी करून नालायक ठरलेला मनुष्य अखेर नाटक कंपनीत शिरायचा ही प्रथा व समजूत. भटकं आयुष्य, छंदीफंदीपणा, व्यसनं यामुळे भद्र समाजात तो अस्पृश्यच ठरायचा. नट म्हणून एखाद्यानं कलेचं जरी शिखर गाठलं तरी समाज त्याला गण्या-भावडया असंच संवोधायचा. ७५ वर्षांपूर्वीची ही परिस्थिती पुढं पालटू लागली.

१८८० च्या सुमारास महाराष्ट्रातील सामाजिक जीवनाच्या सर्व अंगांमध्ये जी एक जागृतीची लाट आली, त्या लाटेत एका प्रतिष्ठीत व व्यासंगी सरकारी कारकुनानं नाटयविषयक जो प्रयोग करून पाहिला त्याला तात्कालीन सार्वजनिक जीवनात एका महत्त्वाच्या घटनेची योग्यता लाभली. त्याची खूण म्हणजे कंपनीच्या परिचय पत्रिकेला लोकमान्य टिळकांसह अनेक मातव्वरांच्या सह्या लाभल्या ही होय. अशा तऱ्हेने या व्यवसायावरचा अप्रतिष्ठीतपणाचा कलंक जरी कमी होऊ लागला, तरी खुद्द नटांचा वैयक्तिक दर्जा फारसा वाढला नाही. भावडयाचा भाऊ झाला. गण्याचा गणू झाला; पण एकवचनाचं वहुवचन झालं नाही. तरी पण या जागृतीच्या काळात काही काही ध्येयनिष्ठ तरुण नाटयकलेचा उच्च दर्जा प्राणपणाने टिकविण्याच्या प्रतिज्ञेनं या व्यवसायात वावरू लागले."

श्री. दाते यांना स्वकर्तृत्व शक्तीची जाणीव आहे; परंतु, त्यावद्दल वृथा अभिमान नाही. त्यांच्या कामगिरीचा महाराष्ट्राने गौरव केला. त्यांना अक्षरशः डोक्यावर घेऊन नाचविलं. सांगली या नाटयपंढरीत त्यांचा भव्य सत्कार केला; परंतु या सत्काराकडे निरीच्छ पद्धतीने पाहण्याचा त्यांचा दृष्टीकोन स्तुत्य आहे. त्यांना चुकूनही 'ग'ची वाधा झाली नाही. नाटयक्षेत्रात काहीतरी भव्यदिव्य करून दाखविण्याच्या महत्त्वाकांक्षेने आपण प्रवेश केला अशी वढाई त्यांनी कधीच मारली नाही. उलट त्यांनी विनयाची कास कधीच सोडली नाही. श्री. दाते म्हणतात, 'माझं भाग्य असं की, महाराष्ट्र नाटक मंडळीसारख्या ध्येयनिष्ठ नाटक कंपनीत माझा प्रवेश झाला. अन् तोसुद्धा कंपनीच्या निमंत्रणाने. परंतु कलेच्या क्षेत्रात नवीन काहीतरी करून दाखविण्याच्या महत्त्वाकांक्षेने मी नाटयक्षेत्रात पाऊल टाकलं असं मला म्हणता येणार नाही. वोलावणं आलं. सहज चूस म्हणून, एक नवा अनुभव म्हणून मी तेथे गेलो इतकंच. हौशी क्लवातली माझी कामं मी ठाकठीक केली होती. प्रेक्षकांच्या गर्दीसमोर झगझगीत दिव्याच्या लखलखाटात उभं राहताना माझं मन कधीच कचरलं नव्हतं. त्यामुळे जुना व्यवसाय सोडून हा नवा व्यवसाय पत्करताना मनात आत्मविश्वास होता. मन स्थिर होतं. तरी पण कोणा तरी वडीलधाऱ्या माणसाच्या आशीर्वादाची उणीव मनाला भासत होतीच. मुंवईत माझं नातलग वडीलधारं माणूस कोणीच नव्हतं. तेव्हा माझ्या एका मित्राच्या प्रेमळ मातेला नमस्कार केला–आणि तिचे जिव्हाळयाचे आशीर्वाद मस्तकी धारण करून पुण्याचं सव्वा रुपयाचं मेलचं तिकीट काढलं.











कंपनीतील एक नट मला उतरून घेण्यासाठी पुणे स्टेशनवर हजर होते. त्यांच्याकडे पाहिल्यावर मला आश्चर्याचा, आनंदाचा व अभिमानाचाही एक धक्का–सुखद धक्का बसला. ज्यांची अत्यंत प्रभावी व तळपत्या बुद्धीचं अधिष्ठान असलेली कामं मी पाहिलेली होती असे नाटक मंडळीचे एक थोर नट माझ्यासारख्या सोळा-सतरा वर्षांच्या मुलाला नेण्यासाठी आले होते. नाटक मंडळीच्या उंबरठ्याच्या अलिकडेच अशा गुरुजनांचं दर्शन म्हणजे शुभशकूनच होता तो. मी त्यांच्याबरोबर कंपनीत जाण्यास निघालो. तो वाटेत एका गृहस्थाची गाठ पडली. माझ्या मार्गदर्शक गुरूंनी सांगितलं, "त्यांच्या पाया पड." मी त्यांना अभिवादन केलं. फर्ग्युसन कॉलेजमधील नाणावलेले प्रोफेसर होते ते. माझं शिक्षण कसंबसं इंग्रजी पाचवीपर्यंत झालेलं. त्यामुळे अशा विद्वानाला पाहाणं म्हणजे मला मोठी पर्वणीच वाटली. शकुनात आणखी एक भर पडली.

श्री. केशवराव दाते यांनी नाटक कंपनीच्या बिऱ्हाडी मिळालेले पहिले वहिले अनुभव जतन करून ठेवले आहेत. त्यांना या अनुभवाचं अप्रूप आहे. ते म्हणतात, 'त्यापूर्वी मी कधी नाटक कंपनीचं बिऱ्हाड पाहिलेलं नव्हतं. बिऱ्हाडाचा थाट रेल्वेच्या वेटिंगरूमसारखा भासला. येथले नट मात्र अपेक्षेपेक्षा वेगळे वाटले. त्यांच्या वागण्यात उठवळपणाऐवजी शिस्तशीरपणा दिसत होता. कंपनीतील एक नट बी. ए. च्या वर्गात आहेत हे ऐकून तर मी चकीतच झालो. अखेर कंपनीचे मॅनेजर भेटले. जरा ठेंगण्या बांध्याची, डोक्याला रूबाबदार कोशा बांधलेली, अंगात कोट व उपरणं घेतलेली अशी जरा गंभीर मूर्ती होती. नाटक मंडळीचे हे मॅनेजर एखाद्या प्रोफेसरासारखे दिसत होते. त्यांच्या त्या वजनदार व्यक्तिमत्वाची माझ्या मनावर अतिशय छाप पडली. अशा मंडळींशी संबंध आल्याबद्दल मला आनंद तर वाटलाच; पण माझ्या पोर मनात थोडा धाकही उत्पन्न झाला.

## नाट्य-शिक्षणाचा प्रारंभ

श्री. दाते यांनी सुरवातीला मिळतील ती कामे बिनबोभाटपणे कुरकुर न करता केली. कामाविषयी कधीच अनास्था दाखविली नाही. या त्यांच्या वृत्तीमुळेच सिद्धहस्त कलाकाराचा उदय झाला. यासंबंधीची आठवण सांगताना श्री. दाते म्हणतात, 'कंपनीत पाऊल टाकल्यापासून तिसऱ्याच दिवशी मला एक छोटीशी चार वाक्यांची स्त्री भूमिका मिळाली. कशी कोण जाणे. पण पुढे पाचच दिवसांनी मला बढती मिळाली. त्याच नाटकातली, पंधरा वीस वाक्यांची स्त्री-भूमिका माझ्याकडे सोपविण्यात आली. या बढतीमुळे मला समाधान झालं हे नाकारण्यात अर्थ नाही; परंतु त्याहून विशेष असं काही वाटलं नाही. ही साधी कामं आहेत. ती शक्य तितकी व्यवस्थितपणे माझ्या हातून झालीच पाहिजेत अशी माझी भावना होती.

नाटक मंडळीच्या बिऱ्हाडी श्री. दाते यांचा दिनक्रम आखून दिलेला असायचा. जणू एखादा आश्रम. या दिनक्रमाविषयी श्री. दाते म्हणतात, 'मला स्टेशनवर उतरून घेण्यासाठी आलेल्या नटश्रेष्ठांनी इतर चारपाच पोरांच्या बरोबरीनं मलाही ताब्यात घेतलं. त्यांच्याबरोबर फिरायला जायचं. फिरताना त्यांनी अभिनयाबद्दल, नाटकांबद्दल बोललेलं कानात साठवायचं, परत आल्यावर त्यांनी दिलेली मराठी पुस्तकं मोठ्यानं पण सावकाश वाचायची, असा आश्रमी खाक्या सुरु झाला. कंपनीत आणखी एक वृद्ध गृहस्थ यायचे. नाटक नसेल त्या दिवशी ते आम्हाला आपापला मेकअप करायला लावायचे. लुगडं कसं नेसावं ते शिकवायचे, खडूच्या रेघा जमिनीवर ओढून स्त्रिया उभ्या कशा राहातात, कशा चालतात वगैरेचे धडे हे गृहस्थ आम्हाला शिकवीत असत.

हल्लीच्या नव्या जमान्यात कोणत्याही कलेत प्रभुत्व मिळविण्यासाठी तपश्चर्या करावी लागते याची जाणीव फारच थोड्याना असते. झटपट रंगारी बनण्याकडे प्रत्येकाचा कल असतो. थोड्याच अनुभवानंतर 'बनचुके' होणारे कलावंत अधिक असतात. अशा या पार्श्वभूमीवर श्री. दाते यांनी तरुणपणी अविचल श्रद्धेनं केलेली साधना उठून दिसते. झटपट प्रगती झाली नाही म्हणून त्यांनी कधीच कंटाळा केला नाही. चिकाटीनं ते आपली साधना करीतच राहिले. यासंबंधी ते म्हणतात, "कंपनीत राहून वर्ष झालं तरी सुरवातीच्या छोट्या भूमिकांपलिकडे माझे हात पोचेनात. मला पगारवाढीची आच नव्हती. तसा मी सुखात होतो. जेवून-खाऊन दहा रुपये महिन्याला मिळत होते. अन्नवस्त्राची ददात नसल्यामुळे त्या दहा रुपयांचं काय करायचं हा प्रश्न मला पडायचा. असमाधान वाटत होतं ते नव्या भूमिका करण्याची संधी मिळत नव्हती म्हणून; परंतु या असमाधानाला लवकरच वाट मिळाली. कंपनीतील एका स्त्री-पार्टी नटाने नवी नाटक कंपनी स्थापन करण्याचा गुप्त संकल्प माझ्यासमोर मांडला. मी या संकल्पात सहभागी झालो आणि एक दिवस आम्ही कोणालाच न सांगता कंपनीला रामराम ठोकला."

ठराविक चाकोरीला चिकटून न राहाता नवीन नवीन साहस करून पाहाण्याचा केशवरावांचा पिंड अगदी तरुणपणातील कलासाधनेच्या काळात प्रकर्षानं आढळतो. तोच पिंड त्यांच्या उभ्या हयातीत जोपासला गेला. या साहसाविषयी सांगताना श्री. दाते म्हणाले, "मला नाव मिळवायचं नव्हतं अगर पैसाही कमवायचा नव्हता. मी बाहेर पडलो तो केवळ जोरात कुठं तरी पुढं जायला मिळावं

म्हणून. तथापि, कुठं पुढं जायचं आणि कुणाच्या ? याची स्पष्ट कल्पना काहीच डोळ्यासमोर नव्हती. आहे त्या स्थितीत मन स्वस्थ बसू देईना एवढंच; पण लवकरच आमचं हे साहस संपुष्टात आलं. पंधरा दिवस पुन्हा बाहेर पडण्याचं आश्वासन देऊन माझे नट मित्र पुन्हा कंपनीत जाऊन दाखल झाले. त्यांच्यासाठी मी पंधरा दिवस वाट पाहायची असा त्यांचा माझा शब्दकरार झाला होता; परंतु पुढल्या पंधरा दिवसातच काय पण महिना झाला तरी ते परत आलेच नाहीत.

झालं ! आमचं नाटकी आयुष्य संपलं. गंमतीनं म्हणून नाटच-क्षेत्रात गेलो; परंतु आता बाहेर पडलो तो जरा निराश होऊनच. आपलं हे काम नव्हे, असं मनाचं समाधान करीत मुंबईला जुन्या व्यवसायाकडे वळण्याचं ठरविलं."

श्री. दाते यांनी निराशेच्या भरात नाटच-व्यवसायाला रामराम ठोकून पुन्हा कम्पाऊंडरच्या व्यवसायात प्रवेश करण्याचं ठरविलं होतं. त्यांचा हा बेत तडीस गेला असता तर मराठी रंगभूमीचं कधीच भरून न येणारं नुकसान झालं असतं; परंतु केशवरावांचा हा निर्णय नियतीला मुळीच मंजूर नव्हता. नियतीनं त्यांना पुन्हा नाटक मंडळीच्या बिऱ्हाडी खेचून नेलं व नवोदित नौकाना मार्गदर्शन करणारा हा दैदीप्यमान तारा निर्माण केला. पुन्हा कम्पाऊंडर बनायचं म्हणजे नाटकी वेषाला रजा द्यायला हवी. त्याची पूर्वतयारी म्हणून कंपनीत असताना वाढविलेला केशसंभार उतरविण्यासाठी सलूनला भेट द्यायला हवी होती. त्या दृष्टीने केशवराव सलूनमध्ये जायला निघाले असता अवचितपणे कंपनीचे मॅनेजर दत्त म्हणून त्यांच्या पुढ्यात उभे राहिले.

"कुठं चाललास ?"

"केशवपन करायला चाललो."

"मूर्ख आहेस. चल. मी तुला परत कंपनीत न्यायला आलो आहे."

अशा रीतीने श्री. दाते यांनी पुन्हा नाटक मंडळीच्या बिऱ्हाडी पाऊल टाकले ते कायमचेच ! पुन्हा नाटक कंपनी सोडण्याचा विचार त्यांना चुकूनही शिवला नाही.

या 'पुनरागमनायच'बद्दलची आठवण सांगताना श्री. दाते म्हणाले, "मी पुन्हा नाटक मंडळीच्या बिऱ्हाडी पाऊल टाकलं. यावेळीसुद्धा मॅनेजर मला बोलवायला आले होते ही गोष्ट मला उत्तेजित करीत होती. या खेपेला मात्र चांगल्या भूमिका मिळू लागल्या. दुय्यम नायिकेच्या भूमिकेपर्यंत मी प्रगतीचा टप्पा गाठला. या भूमिका मला माझ्या मार्गदर्शक गुरुजींनी शिकविल्या होत्या. याच सुमारास 'झुंझारराव' नाटकात कमळजेची भूमिका करण्याची संधी मला एकदा सहज मिळाली—आणि माझा 'एकच प्याला'तील सुधाकर बनला. ही भूमिका करीत असताना नाटचकलेचा व अभिनयाचा उच्च आनंद म्हणजे काय याचा मला साक्षात्कारासारखा अनुभव मिळाला. या भूमिकेपासून नाटचकलेचा मी खराखुरा एकनिष्ठ भक्त बनलो. नटाचा पेशा मी मनोमनं स्वीकारला तो याच वेळी.

अभिजात कलाकार ( Character Actor ) म्हणून आज महाराष्ट्राला सुपरिचित असलेल्या केशवराव दाते यांच्यासारख्या कलाकाराला साधनेच्या काळात स्त्री-भूमिका कराव्या लागत होत्या हे आज कदाचित् कुणाला सांगून खरं वाटणार नाही. आपद्धर्म म्हणून ते स्त्री-भूमिका करीत असत; परंतु त्यांना मनापासून स्त्री-भूमिका करायला आवडत नसत. ती गोष्ट त्यांच्या मनात डाचत होती. परंतु, अखेर या स्त्री-भूमिकांच्या कचाटचातून श्री. दाते यांची सुटका झाली. यासंबंधीचा अनुभव निवेदन करताना श्री. दाते म्हणतात, "नाटचाचार्य खाडिलकर यांच्या कृपेनं माझी स्त्री-भूमिकांच्या कचाटचातून सुटका झाली. त्यांच्या एका नाटकात त्यांच्या मनाजोगता नायक मिळत नव्हता; त्यांना हवा होता एक नवजवान कोवळा तरुण. अखेर त्या कामासाठी माझी निवड झाली. घरटचात अडकलेल्या पक्ष्याच्या पिलाला प्रथमच अफाट आभाळात भरारी मारण्याची संधी मिळावी तसं मला वाटलं. या भूमिकेची तालीम नाटचाचार्यांकडून सतत दीड महिना मला एकटचाला मिळाली होती. त्यात भूमिकेच्या विश्लेषणाचा बौद्धिक आनंद काय असतो याची प्रचीती मला प्रथमच अनुभवायला मिळाली. नाटचाचार्यांकडून मिळालेलं हे शिक्षण म्हणजे माझ्या नाटकी जीवनातली एक महत्त्वाची घटना आहे.

थोड्याच दिवसात आमच्या कंपनीत फाटाफूट होऊन वरच्या दर्जाचे तयार झालेले बहुसंख्य नट कंपनीतून निघून गेले. साहजिकच बाकी राहिलेल्या मंडळीत मीच दुढ्ढाचार्य ठरलो. सर्व वेळ तऱ्हेतऱ्हेच्या प्रमुख भूमिका भराभर माझ्या वाटचाला येऊ लागल्या."

यानंतरचा पाच वर्षांचा काळ केशवरावांच्या नाटचक्षेत्रातील कारकीर्दीत अत्यंत सुखाचा काळ ठरला. यासंबंधी श्री. दाते म्हणतात, "त्यावेळी आम्ही पाचसहा समवयस्क रसिक तरुण एकत्र आलो होतो. आम्हांपैकी कुणालाच घरचा पाश नव्हता. अन्नवस्त्राची ददात नव्हती. नाटकात कसून कामं करण्यापलिकडं कसलीच जबाबदारी नव्हती. कंपनीची कारभारी मंडळी आमच्यावर लक्ष ठेवीत होती. पाऊल वाकडं पडू नये म्हणून ते कानउघाडणीही करीत होती.

त्यामुळे कॉलेजातील व सुखवस्तू तरुण ज्या आनंदात व मस्तीत जगतात त्याच धुंदीत आम्ही ही वर्षे घालविली. नाटचव्यवसायासारख्या मोहमय वातावरणात सतत वावरत असल्यामुळेच की काय, मोहाच्या मर्यादा जाणवत होत्या. त्याचबरोबर काव्याचं, कलेचं व सौंदर्याचं रसग्रहण करण्याची आमची ताकदही वाढत होती. आमच्यापैकी कुणीही विद्वान नव्हता. तरी अनेक नाटच व नाटच-विषयक ग्रंथांचं वाचन आम्ही मोठ्या उत्साहानं केलं, हिरीरीनं त्याच्यावर चर्चा केल्या, मांडलो. आश्चर्य वाटेल, पण मोरोपंतांच्या महाभारतासारखे ग्रंथ आम्ही अक्षरशः पालथे घातले. ही वर्षे माझी प्रत्यक्ष व्यवसायाची होती की पूर्वतयारीची होती हे सांगता येणार नाही. अखेर हा पाच वर्षांचा कालखंड एकाद्या रम्य स्वप्नासारखा संपला; पण खऱ्या अर्थानं या नाटच—व्यवसायात माझं येथेच पहिलं पाऊल पडलं."

**[क्रमशः]**






# “नाश्त्याबरोबर मी नेहमी तांबं खातो !”



शिवाय लोह, कॅल्शियम अन् आयोडिन खातो ते वेगळंच. खरं तर हे सदगृहस्थ ८ महत्त्वाची खनिज द्रव्ये अन् ११ अत्यावश्यक जीवनसत्त्वे घेत असतात. निरोगी जीवनाला अपरिहार्य असलेली ही सारी द्रव्ये व्हिमग्रॅनच्या अवघ्या एका टॅब्लेटमध्ये सामावलेली असतात. नुसतेच आरोग्य नाही तर उत्साह अन् प्रखर रोगप्रतिबंधक शक्ति यांसाठी आवश्यक असणारी सारी जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये व्हिमग्रॅनमध्ये आहेत. उदाहरणच द्यावयाचे झाले तर तांबं घ्या. ताज्या रक्ताची निर्मिती अन् कामासाठी लागणारा उत्साह आपल्याला या खनिजामुळे मिळतो. व्हिमग्रॅनमधील इतर जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये नियमित घेतल्याने या सदगृहस्थांची त्वचा अन् दृष्टी अतिशय निरोगी राहिली असून त्यांचे दात अन् हाडेही पूर्वी कधी नव्हती एवढी कणखर आहेत.

## व्हिमग्रॅन

अनेकविध जीवनसत्वे
व खनिजे असलेल्या टॅबलेटस






® हा रजिस्टर्ड ट्रेडमार्क ई.आर. स्क्विब अँड सन्स यांचा असून तो वापरण्याची अनुमती करमचंद प्रेमचंद प्रा. लि. यानी मिळविली आहे.

**व्हिमग्रॅनची अवघी एक टॅबलेट दिवसासाठी लागणारा सारा उत्साह मिळवून देते.**

SQUIBB®
SARABHAI CHEMICALS

Shilpi-VIM-11A/70 Mar












अनुक्रमणिका

पहिल्या पारितोषिकाची विनोदी कथा



यशवंत गोडबोले

# शेपूट तुटलेला उंदीर

सकाळची आठ-साडे आठची वेळ. स्नान आटोपून काहीतरी स्तोत्र पुटपुटत, श्रीयुत खुळे दोन्ही मुलांचा अभ्यास घेण्याचं नाटक करीत त्यांच्या अभ्यासात उगीचच ढवळाढवळ करीत होते. आठवीतला अवि आणि सहावीतली सविता–दोघंही टेबलाजवळ बसली होती. सकाळी एकदा आरडाओरडा करीत मुलांचा अभ्यास घेतला की श्री. खुळचांची कुटुंबप्रमुख म्हणून जबाबदारी संपते. मुलांचा अभ्यास घेण्यामागे, मुलांच्या डोक्यात काही प्रकाश पडण्यापेक्षा, सौ. खुळचाना नवरा मुलांच्या अभ्यासाकडे बघतो हे पटावं हाच उद्देश असतो.

"बाबा, हे गणित येत नाही" अवि गणिताचं पुस्तक पुढं करीत म्हणतो.

गणित न पहाताच श्री. खुळे वरच्या सुरात ओरडतात, "एवढं साधं गणित येत नाही ? शाळेत काय झोपा काढता ?"

त्यांना वाटलं होत, या भडीमारानं अवि गप्प बसेल; पण तसं झालं नाही.

तो ठणकावून म्हणाला, "मी दोनतीनदा प्रयत्न केला, पण येत नाही. आणि तुम्हालासुद्धा येईल की नाही याची शंकाच आहे."

"मूर्खा, माझी अक्कल काढतोस ? वाच पाहू ते गणित."

अवि वाचू लागतो. "गुणक काढा. व्युत्क्रम पदावली किंवा परिवर्ती पद्धतीने..."

"काय काय ? पुन्हा वाच !"

अवि तेच पुन्हा वाचतो पण तरीही विशेष परिणाम होत नाही. मग आवाज खाली आणून खुळे म्हणतात, "अरे, आमच्यावेळी इंग्रजीतून आलजिब्रा होता. हे तुमचं मराठी बीजगणित आम्हाला येणार नाही."

"मग निबंध तरी सांगा" अवि निबंधाची वही पुढं घेत म्हणतो.

"येस्. येस. व्हॉट्स दी सबजेक्ट ? प्रथम निबंधाचे मुद्दे काढावेत आणि मग प्रत्येक मुद्याचा विस्तार करावा. सुरुवात आणि शेवट परिणामकारक झाले पाहिजेत. कळलं ? काय आहे विषय ?"

"बँकांचे राष्ट्रीयीकरण आणि सामान्य जनता."

"माय गॉड ! युवराज, आपले पिताजी कधी मोड घेण्यासाठी सुद्धा बँकेची पायरी चढलेले नाहीत. तेव्हा हा आपला विषय नव्हे. बरं दुसरा काही अभ्यास ?"

अवि निबंधाची वही बाजूला सारून हिंदीची गृहपाठाची वही पुढे घेऊन म्हणतो, "हिंदीत भाषांतर करायचंय."

खुळे खूष होऊन म्हणता, "अच्छा, अच्छा ! पढो ! मैं शासकीय प्राज्ञ परिक्शा प्रथम श्रेणीमें उत्तीर्ण हो गया हूं।"

अवि वाचू लागतो. "मानसशास्त्र असं सांगतं की, वर्चस्व गाजविण्याची मानवाची एक मूलभूत प्रबळ प्रेरणा असते. प्रत्येक जण ही आस तृप्त करण्यासाठी अहर्निश आपल्या परिवारावर प्रभुत्व गाजविण्याची पराकाष्ठा करतो आणि त्यासाठी विधायक किंवा प्रसंगी विध्वंसकही साधनं वापरतो..."

खुळे दबल्या सुरात म्हणतात, "पुरे पुरे ! मला गरगरल्या-सारखं होतंय. तू स्वतःच प्रयत्न करून पहा. मग मी दुरुस्त करून देईन हं !"

घड्याळाकडे बघून खुळे चटकन उठतात आणि आरशासमोर उभं राहून भांग पाडताना स्वतःशीच पुटपुटतात, "कमाल आहे ! आम्हांला प्रथम श्रेणी कशी मिळाली देव जाणे !"

तेवढ्यात सौ. खुळे बाहेर येतात. बेताच्या उंचीच्या पण गर-गरीत शरीराच्या. नवऱ्याकडे बघत म्हणतात, "जरा मुलांच्या अभ्यासाकडे बघत जा. परीक्षा जवळ आलीय."

"अग, माझं लक्ष असतंच ! आता अविचं गणित, निबंध आणि हिंदी घेतलं. अडेल ते त्यांनी विचारावं...बरं, ऑफिसात जायला एखादी चांगली पँट आहे का ?"

सौ. खुळे कपाट उघडून निरनिराळ्या खणांतून तीन पँट्स काढून कॉटवर टाकतात आणि आत जातात. तेवढ्यात 'धावा.. धावा...' असा सौ. खुळ्यांचा आवाज येतो. श्री. खुळे धावतच आत जातात पण सौ. खुळे अभंग म्हणत असतात, 'धावा...धावा पंढरिनाथा !'

श्रीयुत खुळे काही न बोलता हळूच परत फिरतात. सौ. खुळ्यांनी ठेवलेल्या तीन पँट्सची तपासणी करतात आणि राग आवरून मुद्दाम लाडक्या नावानं सौ. खुळ्यांना हाक मारतात, "राणी, ए राणी !"

तरातरा बाहेर येत सौ. खुळे म्हणतात, "मला 'राणी' म्हणून हाक मारीत जाऊ नका. तुम्ही माझं नाव ठेवलं आहेत कौसल्या ! हु ! कसलं जुनाट नाव ! नशीब माझं, कैकयी नाही ठेवलंत !"

"अग पण, इतके दिवस 'राणी' म्हणून हाक मारण्याला तू कधीच ऑब्जेक्शन घेतलं नाहीस."

"नसेल पण आता घेतेय. त्या समोरच्या ब्लॉकमध्ये ती पंजाबी फॅमिली रहायला आलीय ना ? त्यांच्या त्या नटव्या मुलीचं नाव राणी आहे. तुम्ही मला हाक मारलीत की, ती मेली तरातरा गॅलरीत येऊन इकडे बघते."

श्री. खुळे चिडून म्हणतात, "बघेना !"

"हो!. तुम्हाला तेच हवंय !"

"अग, चष्मा लावल्याशिवाय मला समोरच्या गॅलरीत पोरगी आहे की अल्शेशियन कुत्री आहे हेसुद्धा नीट समजत नाही. बरं, ते जाऊ दे ! ह्या तीन पँट्स ठेवल्या आहेस त्यातली एक तरी धड आहे का ? परवा रेडिओवर एक गाणं लागलं होतं. त्याच चालीवर या पँट्सवरही गाणं रचता येईल...

"तीन पँटी सापडल्या–तीन पँटी सापडल्या.
त्यातल्या दोन मळलेल्या–तिसरी बिनधुतलेली !
बिनधुतलेल्या तीन पँटीत––
दोन्हीला नाहीत बटणे–तिसरीची बटणे तुटलेली !
बटणे तुटलेल्या तीन पॅन्टीत–
दोन चुरगाळलेल्या–तर तिसरीला नाही इस्त्री !"

**...एरवी मुखस्तंभासारखे बसता महाबळेश्वरला भर पावसात बॉम्बे पॉइंटवर बसलो.. किती रम्य-भव्य देखावा होता तो....म्हटलं काहीतरी काव्यमय बोलाल.. आणि बोललात एकच वाक्य... 'पोट जड वाटतंय, परगेटिव्ह घ्यायला हवं....'**

सौ. खुळे रागारागानं आत निघून जातात. श्रीयुत खुळे तीन पँट्समधून एक त्यातल्या त्यात बरी पँट काढून तिची व्यवस्थित घडी करतात आणि ती कॉटवरच्या चादरीखाली ठेवून सौ. खुळ्यांना हाक मारतात "कौसल्याबाई ! अहो कौसल्याबाई !"

सौ. खुळे पुन्हा तावातावानं बाहेर येत रागानं विचारतात, "आता काय काम आहे ? स्वैपाक करू देणार की नाही ?"

कॉटवरची चादर साफसूफ करीत खुळे म्हणतात, "स्वैपाक रोजचाच आहे ग ! जरा इथं बैस. सुखदुःखाचे चार शब्द बोल."

"एवढी का लहर आलीय आज ? एरवी मुखस्तंभासारखे बसता. महाबळेश्वरला बॉम्बे पॉईंटवर भर पावसाळ्यात मुद्दाम गेलो. किती भव्य देखावा होता... म्हटलं, काहीतरी काव्यमय बोलाल. तर एकच वाक्य बोललात 'पोट जड वाटतंय, परगेटिव्ह घ्यायला हवं !"

"तेच ते कितीदा काढशील ? खरंच माझं पोट तेव्हा बिघडलं होतं ! बरं गप्पा नकोत–नुसती बैस इथं."

सौ. खुळ्यांनी चादरीखाली पाहिलं. तिथं घडी करून ठेवलेली पॅन्ट पाहून त्या रागावून म्हणतात, "हे हो काय ? त्या भैय्याकडे का नाही इस्त्रीला देत?"

"प्लीज ! प्लीज ! आजच्या दिवस..."

सौ. खुळे धपकन कॉटवर बसतात आणि श्रीयुत खुळे मनगटा-तल्या घड्याळात बघत उभे राहतात ! तीन मिनिटांनंतर म्हणतात, "हं ! उठ आता."

सौ. खुळे तरातरा आत जातात.

चादरीखालची पॅन्ट काढीत खुळे म्हणतात, "वा ! काय कडक इस्त्री झालीय ! दारावर पाटी लावायला हरकत नाही– 'इस्त्री चालू आहे'–नुसता 'बसून' पैसा !"

सविता खळखळून हसते. अवि ओरडून म्हणतो, "आई, बाबा बघ काय म्हणताहेत."

"ए कार्टया ! चूप बैस !" खुळे अविला दटावतात.

"मी नाही गप्प बसणार ! मला पतंगाला दहा पैसे द्या."

दोन दहा पैशांची नाणी त्याच्याकडे फेकीत खुळे म्हणतात, "हे घे तुला आणि सविताला. छळवादी आहेत कार्टी. 'कुटुंब लहान सुख महान' म्हणे–कुठाय ते सुख ?"

तेवढ्यात सौ. खुळे चहाचा कप घेऊन बाहेर येत म्हणतात, "हा चहा चटकन् घेऊन टाका–ती शेजारची कटकट येण्यापूर्वी."

खुळे निम्मा चहा बशीत ओतून कप टेबलावर ठेवतात. तेवढ्यात शेजारच्या म्हसकरांचे श्वशुर–अप्पा–येतात.








"हें हें हें ! आज चहा लौकर केलाय वाटतं ?" असे पुटपुटत अप्पा टेबलावरचा कप उचलीत म्हणतात, "सूनबाई, मी यातलाच अर्धा कप चहा घेतो हं !"

अप्पा चहा पिऊन, पेपर घेऊन आरामखुर्चीत बसतात.

तेवढ्यात सविता इंग्रजी रीडरमधला 'माऊसेस टेल' हा धडा जोरजोरात वाचू लागते.

"रजा मिळाली की नाही तुम्हाला ?" अप्पा खुळ्यांना विचारतात.

खुळे स्वतःशीच हसत म्हणतात, "हो. आज मिळेल बहुतेक."

"अस्सं ? काय युक्ती केलीत बुवा ? तुम्ही तर म्हणत होता की, तुमचे महामुनी साहेब रजा देणार नाहीत."

खो-खो हसत खुळे म्हणतात, "अप्पा, सविता इंग्रजी धडा वाचतेय तो ऐकलात का ? त्यावरूनच मला कल्पना सुचली. गोष्ट आहे एका उंदराची. त्याचं शेपूट मांजर तोडतं. शेपूट परत मागताच मांजर दुधाची मागणी करतं. उंदीर गाईकडे जातो..गाय गवताची मागणी करते. उंदीर शेतकऱ्याकडे जातो. शेतकरी पावाची मागणी करतो. उंदीर बेकरीवाल्याकडे जातो.. बेकरीवाला त्याला पाव देतो. उंदीर तो पाव शेतकऱ्याला देऊन गवत घेतो. गवत गाईला देऊन दूध घेतो आणि दूध मांजराला देऊन आपलं शेपूट परत घेतो."




"पण या गोष्टीवरून तुम्हाला काय कल्पना सुचली ?"

खुळे म्हणतात, "अहो या गोष्टीत एक मोठं कटु सत्य सांगितलय जिथंतिथं लाच दिल्याशिवाय कामं होत नाहीत हा धडा रीडरमध्ये अगदी प्रथम देण्यातही औचित्य दिसून येतं !"

"पण याचा तुमच्या रजेशी काय संबंध ?"

ऑफिसला जाण्याचे कपडे चढवीत श्रीयुत खुळे सांगू लागतात–

"मी शिक्षण खात्यात नोकरीला आहे. या जून महिन्यात रजा मिळणं अत्यंत कठीण. मला तर रजा हवीच होती. मग दोन दिवसाखाली सविता हाच धडा वाचीत असताना मला एक कल्पना सुचली. आमच्याकडे नुकतेच महामुनी नावाचे साहेब बदलून आले आहेत. त्यांना खूष केलं तर रजा मिळेल याची मला खात्री होती. या महामुनीसाहेबांना हवंय दुधाचं कार्ड. त्यांना दुधाचं कार्ड मिळवून दिलं की रजा नक्की मंजूर होणार. मग काल दुपारी मी अर्धा दिवस रजा घेतली आणि लिमिटेड बसनं वरळी डेअरीकडे निघालो. तिकडे प्रथमच जात असल्यामुळे नक्की कोणत्या स्टॉपवर उतरायचं हे माहित नव्हतं. शेजारच्या माणसाला विचारल्यावर तो म्हणाला, 'वरळी नाक्यावर उतरा' ते ऐकून समोरच्या बाकावरचा सिंधी म्हणाला, "लोटस टॉकीजके स्टॉपपर उतर जाव." त्या दोघांचं भांडणच सुरू झालं ! ते भांडण इतकं विकोपाला गेलं की, लोटस टॉकीजचा स्टॉप येताच त्या सिंधी माणसानं मला खसकन ओढलं आणि बसबाहेर ढकलून दिलं !"

"हा ऽ हा ऽ हा ऽ!" अप्पा जोरजोरात हसत म्हणतात, "कमाल आहे! फार हसवू नका हं मला. हार्ट–ट्रबल आहे."

"मग मी डेअरीत गेलो. तिथं वैरागी नावाचा माझा मित्र आहे. त्याला भेटलो. तो म्हणाला, मी तुझ्या साहेबाचं दुधाच्या कार्डाचं काम करीन पण तू माझं एक काम केलं पाहिजे."

"छान ! काय होतं त्याचं काम ?"

"त्याच्या मुलाला ॲप्रेंटीस म्हणून अंधेरीच्या एका कारखान्यात लावायचं होतं आणि त्या कारखान्याचे मॅनेजर गोसावी हे माझ्या ओळखीचे होते. मग मी डेअरीतून गेलो अंधेरीच्या गोसाव्याकडे आणि गोसाव्यांना म्हणालो. ."

अप्पा वाक्य पुरं करतात, "तुम्ही वैराग्यांच्या मुलाला ॲप्रेंटीस म्हणून घेतलं तर वैरागी महामुनीसाहेबांना दुधाचं कार्ड देतील आणि महामुनीसाहेब रजा देतील."

"बरोबर ! पण गोसावी म्हणाले, तुम्ही माझं एक काम केलं तर मी वैराग्यांच्या मुलाला ॲप्रेंटीस म्हणून घेईन."

"छान ! काय होतं त्यांचं काम ?"

"त्यांच्या कारखान्यासाठी काही स्पेअर पार्टस् आयात करायचे होते आणि त्यासाठी त्यांना इंपोर्ट-परमिट हवं होतं. माझे सासरे पूर्वी त्या ऑफिसात होते हे त्यांना माहीत होतं. मग मी





सासऱ्यांसह त्या ऑफिसात गेलो आणि तपस्वीसाहेबांना भेटलो आणि त्यांना म्हणालो

अप्पा वाक्य पुरं करतात, "तुम्ही गोसावींना इंपोर्ट परमिट दिलंत तर ते वैरागींच्या मुलाला ॲप्रेंटीस म्हणून घेतील. वैरागी महामुनींसाठी दुधाचं कार्ड देतील आणि महामुनीसाहेब रजा देतील."

"करेक्ट! पण तिथंही अडचण आलीच!"

"अस्सं? त्यांची काय मागणी होती?"

"त्यांच्या मुलीला रेडिओवर होणाऱ्या श्रुतिकांमध्ये काम करण्याचा चान्स हवा होता. त्यासाठी मी माझ्या योगी नावाच्या मित्राकडे वशिला लावावा असं त्यांचं म्हणणं होतं. मग मी योगीकडे गेलो आणि त्याला म्हणालो..."

अप्पा मंत्र म्हणावा तसं पुढं म्हणतात—"तू तपस्वींच्या मुलीला रेडिओवर चान्स दिलास तर तपस्वी गोसावींना इंपोर्ट-परमिट देतील, गोसावी वैरागींच्या मुलाला ॲप्रेंटीस म्हणून घेतील, वैरागी महामुनींसाठी दुधाचं कार्ड देतील आणि महामुनीसाहेब रजा देतील!"

"करेक्ट! मग योगीनं तपस्वींच्या मुलीची चाचणी घेतली. ती सुरेख किंचाळू शकते.. तिला नाना प्रकारे रडता येते गदगदून, मुसमुसून, ओक्साबोक्शी... रडता रडता, हुंदके देता देता सुरेख लांबलचक काव्यमय बोलता येतं. थोडक्यात म्हणजे मराठी श्रुतिकांमध्ये आवश्यक असणाऱ्या मुख्य गुणांचा तिच्याजवळ भरपूर साठा आहे याची खात्री पटताच योगीनं तिला चान्स द्यायचं कबूल केलं!"

"हाऽ हाऽ हाऽ! हार्ट वीक आहे म्हणून जोरात हसताही येत नाही! कमाल करता बुवा तुम्ही! बाकी, हे अगदी खरं आहे हं. त्यामुळे हल्ली श्रुतिका सुरू झाली की, ज्यांच्या घरी लहान मुलं आहेत ते रेडियो बंद करतात. बरं, मग काय झालं?"

"ती तपस्वींची मुलगी चाचणी परीक्षेत पास झाली. इतकी सुरेख रडणारी मुलगी त्यांना कित्येक दिवस मिळतच नव्हती म्हणे! आता आजही मी रजा घेतलीय. आज आता तपस्वी गोसावींना इंपोर्ट-परमिट देतील, गोसावी वैरागींच्या मुलाला ॲप्रेंटीस म्हणून घेतील, वैरागी महामुनीसाहेबांसाठी दुधाचं कार्ड देतील आणि "

"आणि महामुनीसाहेब तुम्हाला दोन महिने रजा देतील. हाऽ हाऽ हाऽ!"

सौ. खुळे तेवढ्यात लगबगीनं बाहेर येत म्हणतात, "अहो, अप्पांना फार हसवू नका हं! त्यांचं हार्ट वीक आहे."

"बरं, बरं! पण ही पँट काही ठीक नाही बुवा!"

"मग ती हिरवी वुलनची घाला."

"वा! पिवळा शर्ट आणि हिरवी पँट! छान होईल मॅचिंग!"

"इश्श! पुरुषांना कसलं आलाय मॅचिंग?" सौ. खुळे हसत म्हणतात.

"मॅचिंगचा मक्ता फक्त बायकांनाच दिलाय काय? काल ती हिरवी जाळीची प्लॅस्टिक परडी घेऊन भाजीला गेलीस तेव्हा लाल भोपळा न आणता मॅचिंगसाठी दुधी भोपळा—तोही कमंडलूसारखा घेऊन आलीस! फक्त नवरा तेवढा मॅचिंग नाही तुला!"

सौ. खुळे हसत हसत आत जाताच खुळे दबल्या आवाजात अप्पांना म्हणतात, "अप्पा, आमचा जोडा जरा विजोडच आहे हं! प्रथम—प्रथम मी समतोलपणा राखण्याचा बराच प्रयत्न केला. दूध, बदाम, लोणी, अंडी, ग्लॅक्सो, बिस्किटं अशा वस्तूंचा खुराक घेऊन मी सहा महिन्यात माझं वजन १२५ पौंडांवरून १३७ पौंडांवर नेलं, पण इन दी मिनव्हाईल हिचं वजन १५० वरून १६५ पौंडावर गेलं होतं! म्हणजे ती कुठंतरी थांबल्याशिवाय तिला गाठणं मला शक्य नाही!"

अप्पांना जोरजोरात हसता हसता चक्कर आल्यासारखं होतं आणि ते खुर्चीतच ग्लानी येऊन पडतात.

"अप्पा .अप्पा!" श्रीयुत खुळे घाबऱ्या घाबऱ्या हाका मारतात.

सौ. खुळे लगबगीनं बाहेर येत म्हणतात, "काय झालं हो?"

अप्पांची नाडी पहात खुळे म्हणतात, "अरेच्चा! म्हातारा गचकला की काय?"

"त्यांचं हार्ट वीक आहे हे माहीत असून तुम्ही त्याना हसवीत होता."

"जाऊ दे ग! रोज चहा प्यायला सोकावला होता. मी म्हसकरांना सांगून येतो. तेही सुटकेचा श्वास सोडतील."

श्रीयुत खुळे दारापर्यंत जातात.

सौ. खुळे अप्पांकडे निरखून बघत असतानाच अप्पा पटकन् उठून बसून डोळे उघडतात. सौ. खुळे घाबरून एकदम किंचाळतात.

अप्पा म्हणतात, "अहो, मी काही मेलो नव्हतो. जरा ग्लानी आली होती. थोडा गरम चहा मिळेल का?"

सौ. खुळे म्हणतात, "हो. हो. आत्ता आणते हं! थोडं आलंही घालते ठेचून."

श्री. खुळे पुटपुटतात, "कमाल आहे. एका चहासाठी केवढं हे नाटक! मी चलतो आता. मला उशीर होतोय."

"अहो, तुम्हीही चहा घेऊन जा. दोन कप ठेवलाय." सौ. खुळे म्हणतात.

श्रीयुत खुळे क्षणभर घोटाळतात.

अप्पा म्हणतात, "सूनबाई, त्यांना उशीर होतोय. मीच घेईन दोन्ही कप चहा!"

श्री. खुळे रागारागाने बाहेर जाऊन खाडकन् दार लावून घेतात आणि अप्पा हाऽ हाऽ हाऽ असं जोरजोरात हसत असतानाच आमची कथा संपते!

● ● ●

# प्रे र णा

**लेखांक दुसरा**



—चित्रकार द. ग. गोडसे

# व ळि या चा अं ग सं ग

शिवाजी राजांचे फारसी पत्र गेल्या लेखात पाहिले. या पत्राचा मजकूर वाचल्यानंतर हे पत्र केवळ राजकीय नसून, त्याशिवाय अधिक काहीतरी आहे याची जाणीव होते. प्रथमदर्शनी हे पत्र राजकीय वाटले—आणि तसे ते एका अर्थाने राजकीय होतेही—तरी ह्या पत्रातील राजकीय संदर्भ फक्त निमित्तमात्र आहेत. आणि राजकारणाच्या निमित्ताने या पत्रात जे काही अधिक सांगण्यात अथवा सूचित करण्यात आले आहे, ते अधिक महत्त्वाचे, राजकारणापलीकडचे, अधिक शाश्वत स्वरूपाचे असल्याचे दिसून येते. आज तर ह्या पत्रातील तत्कालीन राजकारणही नाहीसे होऊन त्यानिमित्ताने लिहिण्यात आलेला मजकूरच अधिक अभ्यवसनीय झाला आहे, एक लेख म्हणून, एक आविष्कार म्हणून !

——एक शिवकालीन आविष्कार या दृष्टीनेच या पत्राचा आज अभ्यास करावयाचा आहे.

वतनाच्या संकल्पने संबंधीची (शिवाजी राजांची) ईर्षा हे या आविष्काराचे एकमेव शक्तिकेंद्र आहे. या ईर्षेने प्रस्फुरित केलेल्या प्रेरणेने हा आविष्कार निर्माण केला आहे व या प्रेरणेचा प्रभाव साऱ्या आविष्कारावर आहे. आविष्काराची विशिष्ट प्राकृतिक जडणघडण, त्याचा थाटघाट, त्यातील तालतोल ही सारी ह्या प्रेरणेच्या योजनेने साकारली आहेत; तिच्या अनुज्ञेने नियत आहेत. प्रेरणेला संमत असेल तेच व तेवढेच या आविष्कारात समाविष्ट आहे, तिला अभिप्रेत नसलेले वगळण्यात आले आहे, कटाक्षाने दूर ठेवण्यात आले आहे. ह्या आविष्काराच्या बाह्य स्वरूपावर त्याचप्रमाणे आविष्कारातील निरनिराळ्या घटकांच्या अंतर्गत संघटनेवरही प्रेरणेचा पूर्ण तावा आहे. सारांश या प्रेरणेची ही निर्मिती आहे आणि तिने निर्माण केलेला एक रचनाबंध म्हणूनच या आविष्काराचा सूक्ष्म अभ्यास करावयाचा आहे.

त्याअगोदर आणखी एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे, ती ही की, ज्या ईर्षेने आविष्कारक्षम प्रेरणा प्रस्फुरित केली ती ईर्षा व प्रेरणा ह्या दोन्हीही, या आविष्कारातील इतर ऐतिहासिक तपशीलाप्रमाणेच त्या विशिष्ट ऐतिहासिक कालखंडाशी निगडीत आहेत. त्या विशिष्ट कालखंडातील ऐतिहासिक तपशीलाच्या साधनांतूनच प्रेरणेने संकल्पिलेला आविष्कार मूर्त झाला आहे. हे येवढ्याचकरिता लक्षात ठेवावयाचे की या रचनाबंधात वापरण्यात आलेले आकार, अवकाश, वजने (शक्तिभार) व व्याप यांच्या तत्कालीन संकेतांचा नेमका व स्पष्ट बोध व्हावा म्हणून.

संघर्ष हा या आविष्काराचा स्थायीभाव आहे. आक्रमण विरुद्ध संरक्षण, बलदंड आक्रमण विरुद्ध 'क्षत्रिय' संरक्षण अशा दोन युयुत्सु शक्तींचा संघर्ष हे या आविष्काराचे कथनसूत्र आहे. या दोन शक्तींच्या अपरिहार्य संघर्षात बलदंड शक्तीचे आक्रमण अखेर निष्फळ ठरले तरीही दोन्हीही शक्ती आपआपल्या सामर्थ्यात तुल्यबळच दाखविण्यात आलेल्या आहेत, हा या आविष्काराचा लक्षणीय विशेष आहे. पराभूत शक्तीचा तुच्छतापूर्वक उल्लेख अथवा अधिक्षेप कोठेच नाही; येवढेच नव्हे तर या दोन्हीही शक्तींचे क्रमशः वाढणारे सामर्थ्य फार कुशलतेने सूचित करण्यात आले आहे.

**...या लेखमालेतील 'शिवरायांचे लिहिणे कैसे?' हा पहिला लेख 'दीपावली'च्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाला होता. तो वाचून अनेक विद्वानांनी आणि चोखंदळ रसिक वाचकांनी त्या लेखाबद्दल समक्ष आणि पत्राद्वारे गौरवोद्‌गार काढले.. त्याच लेखमालेतील तितकाच विचारप्रवर्तक हा दुसरा लेख...**

वतनावर आक्रमण करणारी शक्ती, क्रमशः जशी अधिकाधिक बलशाली बनते, त्याचप्रमाणे वतनाचे संरक्षण करणारी शक्तीही अधिकाधिक निग्रही व प्रभावी बनते. दोन्हीही शक्तींनी आपआपल्या सामर्थ्याची परिसीमा गाठल्यानंतरच (अर्थात ह्या आविष्कारा-पुरती) दोन्ही शक्तींमध्ये शेवटची निकाली झुंज होते व बलाबलाच्या ह्या जीवघेण्या स्पर्धेत संरक्षणाची निग्रही क्षत्रिय शक्ती विजयी ठरून, "वतन व किल्ले आम्ही थोडयाच दिवसात जप्त करतो" या नांदीने सुरू झालेले शक्तीयुद्ध,

"(आक्रमकाचा) घोडा जगात सर्वत्र दौडू शकत नाही, (काही) जागा अशाही असतात (की त्या ठिकाणी आक्रम-काला) आपली ढाल (शरणागतीमुळे) खाली ठेवावी लागते."
––या भरतवाक्याने संपते.

या मंथनातून तत्त्वरूपाने बाहेर पडते ते "ई कसरा मुहाफिजत ए वतन खुद लाजिम" हे वाक्य (मला वतनाचे संरक्षण स्वयं-आवश्यक).

हे सारतत्त्व (आक्रमकांनी) अमान्य केल्यास पुन्हा घोर संघर्षाची भीषण सूचना दिलेली––"सूज्ञांना या रक्ताच्या समुद्राचे भय वाळगणेच इष्ट, कारण (ह्या समुद्रातून) कोणालाही आपली नांव सुरक्षितपणे नेता आली नाही" इ. इ.

अथपासून इतिपर्यंत 'संघर्ष' हाच या रचनाबंधाचा स्थायी-भाव आहे; व प्रत्यक्ष घडलेला संघर्ष, त्याचा निष्कर्ष व तो अमान्य केल्यास, पुन्हा भावी संघर्षाची सूचना असे ह्या संघर्षभावाचे त्रिविध स्वरूप आहे. रचनाबंधाच्या अंतर्गत संघटनेचे हेच तीन घटक. प्रकृतीने ते भिन्न असले तरी अंतर्गत संघटनेने बांधलेले. या घटकांची निर्मिती, त्यांचे विशिष्ट स्वरूप व संघटनेचे घटक म्हणून त्यांचे कार्य व महत्त्व हे सारे प्रेरणा नियोजित आहे. तिने आखलेल्या योजनेबरहुकूमच नियंत्रित आहे. ते कसे?––हे स्पष्ट होण्यासाठी या घटकांचे अधिक जवळून निरीक्षण व अभ्यास करणे आवश्यक आहे.

प्रथम या तिन्ही घटकांची घडण अभ्यासू. त्यावरून त्यांच्या वेगवेगळ्या आकार अवकाशांचा, व्याप वजनांचा अंदाज येऊन, आकृतीबंधाच्या अंतर्गत संघटनेतील त्यांचे महत्त्व नेमके लक्षात यावे.

पैकी प्रत्यक्ष घडलेला संघर्ष हा पहिला घटक. प्रत्यक्ष आणि सविस्तर वर्णन करण्यात आलेला. आक्रमण व संरक्षण ह्या संघर्षा-तील दोन शक्ती. या दोन्हीही शक्ती तुल्यबल दाखविण्याची प्रेरणेने योग्य ती खबरदारी घेतली आहे; आणि त्यामुळेच संघर्ष खऱ्या अर्थाने वास्तव व प्रत्ययकारी झाला आहे. दोन्हीही शक्ती सारख्याच युयुत्सु. एक आक्रमक तर दुसरी प्रतिकाराने स्वयंसंरक्षक. फरक येवढाच की आक्रमक शक्ती प्रत्यक्ष वर्णन करण्यात आलेली तर संरक्षण शक्ती अप्रत्यक्षपणे सुचविली गेलेली. एक प्रत्यक्ष प्रत्ययकारी, वास्तव तर दुसरी अमूर्त, केवळ भाव प्रत्ययकारी. आपआपल्या परीने तुल्यबळ असलेल्या या दोन्हीही शक्तींच्या प्रकृतीत प्रेरणेने बुद्धी-पुरःसर ठेवलेला हा फरक जेवढा सार्थ आहे तेवढाच तो सूचकही आहे. प्रेरणेच्या कल्पनाशक्तीची झेप व रचनाकौशल्यातील सूक्ष्मता यांचा प्रत्यय या दोन परस्पर विरुद्ध शक्तींच्या प्रतिमा-रेखाटनात येतो.

प्रथम आक्रमणशक्तीच्या प्रतिमेचा प्रत्यक्ष वर्णन केलेला विकास बघू. आक्रमण शक्तीचे प्रत्यक्ष, दृकप्रत्ययकारी वर्णन करण्यात दिसून येणारा हेतू उघड आहे. पत्राच्या मजकुरातील पहिल्या वाक्यापासून तो, "खानाच्या मृत्यूनंतर अमीर–उल–उमरा मोहीम घेऊन येथे आला, आकाशाला भिडलेले उत्तुंग, प्रचंड पहाड, थांग न लागणाऱ्या दऱ्या व खोरी यात सतत तीन वर्षे शक्तीपलीकडे अफाट प्रयत्न करून....." इत्यादि मजकुरापर्यंत आक्रमण शक्तीची प्रतिमा अक्षरबरहुकूम प्रभावीपणे उभी करण्यात आली आहे. मजकुराच्या ओघात शब्द, वाक्यागणिक, ही प्रतिमा कशी निश्चित आकार व वजन घेत घेत प्रत्यक्ष साकार होते हे बघण्यासारखे आहे.

"बादशहाचे कर्तबगार अधिकारी व नामवंत सरदार गेली तीन वर्षे या माझ्या प्रांतात येत आहेत; व त्यांना "माझे वतन व










किल्ले जप्त करा" असा पृथ्वीपती बादशहाचा हुकूम आहे. त्यास (त्या हुकुमास) ते (अधिकारी) येथून उत्तर पाठवितात की "ते (वतन व किल्ले) आम्ही थोडयाच दिवसात काबीज करतो."-- मजकुरातील या सुरुवातीच्या वाक्यापासूनच पुढील संघर्षाची सूचना मिळते व आक्रमणाची प्रतिमा साकारण्यास सुरुवात होते.

"कल्याण व बीदर ही खुल्या मैदानातील (ठाणी) (त्यांनी) मोर्चे लावून चढाई करून घेतले", या वाक्याने आक्रमणाची प्रत्यक्ष घटनाच वर्णन करून, "वतन व किल्ले आम्ही थोडयाच दिवसात काबीज करतो"; अशी (गेल्या परिच्छेदात) गर्जना करणारे आक्रमण आता प्रत्यक्ष कृतीशील झाल्याचे दिसते. या कृतीमुळे आक्रमणाला गती तर मिळालीच शिवाय ते अधिक शक्तिशालीही झाले.

"अफझलखान (विजापूरच्या) बादशहाच्या वतीने प्रचंड फौज घेऊन येथे पोहोचला--" येथे आक्रमणाची प्रतिमा निश्चित-पणे मोठी व शक्तिमान झाली. विजापूरची आदिलशाही राजसत्ता, तिच्या दरबारातील मातबर म्हणून गाजलेला सरदार अफझलखान व त्याने आणलेली प्रचंड फौज, ही तिन्हीही वजने आक्रमणाच्या जमेस पडून, पर्यायाने आक्रमण प्रतिमेचा 'शक्तिभार' अधिकच वाढला. आक्रमणाचा आकार व त्याच्या शक्तीचा आशय येथे महान झाला.

"खानाच्या मृत्यूनंतर अमीर-उल-उमरा मोहीम घेऊन आला. आकाशाला भिडलेले उत्तुंग, प्रचंड पहाड व थांग न लाग-णाऱ्या दऱ्याखोरी यात सतत तीन वर्षे तो शक्तीपलीकडे अफाट प्रयत्न करीत होता....." इ. वर्णनाने आक्रमणाच्या प्रतिमेच्या विकासाची कमाल मर्यादा गाठली. आक्रमणाचे शक्य होते तेवढे सारे सामर्थ्य येथे एकवटले. आक्रमक शक्तीची परिसीमा गाठण्यात आली. प्रचंड वजने आक्रमणाच्या जमेस पडली! ! आदिलशाहीपेक्षाही सत्तेने आणि सामर्थ्याने श्रेष्ठ असलेली मोगल पातशाही, तिच्या सम्राटाचा खास सरदार अमीर-उल-उमरा, म्हणजे उमरावांचाही अमीर; त्याने बरोबर आणलेली प्रचंड फौज.. इत्यादी वर्णनाची सारी वजने वरच्या श्रेणीची. आकारात व शक्तिभारात. त्यातच भर, ह्या फौजेने शक्तीपलीकडे केलेल्या अफाट पराक्रमाची व तीन वर्षे येथे सातत्याने रहाण्याची. ह्या कालनिदर्शक वर्णनाने आक्रमण शक्तीच्या प्रतिमेवर महात्म्यतेचा आणखी एक वजनदार थर चढला.

प्रचंड बलदंड आक्रमणाची प्रतिमा शेवटी केवढी महान, गतिमान व शक्तभारी झाली याचे हे प्रत्यक्ष चित्रण.

संरक्षण प्रतिमेचा उभार याहीपेक्षा अधिक लक्ष्यवेधी आहे. हा उभार प्रत्यक्ष वर्णन करण्यात आला नसून, तो कटाक्षाने सूचित करण्यात आला आहे; सूचना, संकेतांचा अत्यंत कुशल उपयोग करून. सूचित असला तरी तो निःसंदिग्ध आहे. आक्रमणाची प्रतिमा प्रत्यक्ष दृकप्रत्ययकारी आहे, तर संरक्षणाची प्रतिमा, या उलट, केवळ भावसंवेद्य आहे. ती तशी उभी करणे जसे आवश्यक होते तेवढेच ते कठीणही होते. प्रेरणेला ते एक आव्हान होते. पण तिने ते स्वीकारले व यशस्वी करून दाखविले. संरक्षणाची महान प्रतिमा केवळ सूचनेने उभी करण्यात प्रेरणेने कलात्मकतेबरोबरच मुत्सद्देगिरीही दाखविली आहे. आविष्कारातील साऱ्या प्रतिमांच्या रूप-स्वरूपावर प्रेरणेची हुकुमत किती सूक्ष्म असते याची प्रचीती येथे येते. प्रेरणेला मान्य असलेले शब्द, वाक्प्रचार, संकेत, दृष्टांत, काव्यपंक्ती इत्यादि सूचक साधनांचाच वापर ही संरक्षण प्रतिमा उभी करण्यात झाला आहे.

पत्राच्या सुरुवातीसच संरक्षणाची असंदिग्ध सूचना प्रथम मिळते ती एका समर्पक चित्रवाण दृष्टांताने....."तर्काच्या कल्पनातीत घोडयाने" "समन्दे तलाश बे कयास" म्हणजे शोधाचा तर्काचा, कल्पनातीत घोडा! वास्तविक पहाता "समन्दे कयास" म्हणजे कल्पनेचा घोडा अथवा "समन्दे बे कयास" म्हणजे कल्पनेचाही कल्पनातीत घोडा असा वाक्प्रचार रूढ आहे; परंतु येथे आवर्जून म्हटले आहे, "समन्दे तलाश बे कयास--" म्हणजे शोधाचा, तर्काचा कल्पनातीत घोडा. प्रेरणेची शब्दयोजना येथे कटाक्षाने काटेकोर आहे. कारण कल्पनेचा 'लहरी घोडा' प्रेरणेला मान्य नाही. तिला अभिप्रेत आहे तर्काचा, शोधाचा, निश्चयी शिस्तीचा घोडा. शक्ती, धृती आणि गती यांचे प्रतीक असलेला. फारसी, मोगली चित्रांतून मोठ्या दिमाखाने दौड करणारा, "नमयति इव गतिर्धरित्रिम्" अशा तोऱ्यात टापा टाकीत चालणारा; विजयाचे, सत्तेचे, शाही प्रतीक असलेला.... उच्चैश्रवा!!

प्रेरणेला येथे स्पष्ट सुचवावयाचे आहे की.... हा उच्चैश्रवा-सुद्धा या पहाडी मुलुखात हतप्रभ ठरतो.








वतनाच्या (प्रदेशाच्या) अवघडपणाच्या या अप्रत्यक्ष वर्णनाने संरक्षणाच्या प्रतिकाराची सूचना प्रथम येथे मिळते. वास्तविक पहाता शोधाला, तर्काला कोणत्याही स्थळी पोहोचावयास प्रत्यवाय कसला? —परंतु तो या प्रदेशात मात्र आहे. निसर्गाने हा प्रदेशच असा तर्कातीत अवघड घडविला की अत्यंत गतिमान तर्काने सुद्धा येथे अगतिक व्हावे. एक अप्रतिहत गतिमान संकेत अशा रीतीने अगतिक ठरवून या वतनावर (प्रदेशावर) होणाऱ्या कोणत्याही आक्रमणाला स्वतः निसर्गाकडूनच येथे कसा विरोध होतो हे मोठ्या चातुर्याने सुचविले आहे. संरक्षण प्रतिमेच्या अदृश्य परंतु अत्यंत निग्रही आणि कार्यक्षम प्रतिकार शक्तीची निःसंदिग्ध कल्पना येथे देण्यात येते. "समन्दे तलाश"ची प्रतिमा म्हणजे तिची पहिली चुणूक.

निसर्गाने हा प्रांत येवढा अवघड घडविला की तर्काच्या घोड्यानेही येथे अगतिक व्हावे, असे गेल्या परिच्छेदात सुचविले. यांवर कोणी शंका काढील "कल्याण व बीदर हे किल्ले त्यांनी (बादशहाच्या सरदारांनी) घेतले त्याचे काय?" शंका रास्त आहे. कल्याण व बीदर हे किल्ले त्यांनी मोर्चे लावून चढाई करून घेतले हे खरे आहे. पण ते घेणे तसे सोपेही होते. कारण ते खुल्या मैदानांतच आहेत. मोर्चे लावणे व चढाई करणे तेथेच शक्य आहे. पण हे (माझे) वतन म्हणजे कल्याण व बीदर यांसारखे नाहीच. असे मोर्चे लावून चढाई करण्यालायक ते मोकळेही नाही. हे (माझे) वतन म्हणजे पहाड, प्रत्यक्ष पहाड!! दोनशे कोस लांब, चाळीस कोस रुंद; ठायी ठायी पार करण्यास कठीण असे नाले-ओहोळ; शिवाय त्यातच अत्यंत मजबूत व दुर्गम असे साठ किल्ले बांधलेले पैकी काही समुद्र किनाऱ्यावर."

वतनातील अवघड निसर्गाच्या वर्णनाचे निमित्त करून वतनाची प्रचंड संरक्षण क्षमता अप्रत्यक्षपणे सुचविण्याची ही पर्वता-एवढी संधी प्रेरणेने कधीच वाया घालविली नसती. उलट ह्या संधीचा भरपूर फायदा घेऊन तिने संरक्षणाची मनोगम्य प्रतिमा एवढ्या प्रचंड प्रमाणावर उभी केली की तिच्या विराट स्वरूपाची कल्पना येऊन, जाणत्यांनी मुहुर्तभर दिङ्मूढ व्हावे.

या प्रतिमेची सारीच परिमाणे अफाट आणि अजस्र! तिची लांबी रुंदी मोजायची ती कोसांच्या मापाने; उंची आणि खोली शोधायची अक्षरशः आकाशपाताळ एक करून: थांग न लागणाऱ्या गर्द दऱ्याखोरी धुंडाळून, सुसाट ओढीने खळाळणारे असंख्य बेभान नाले—ओहोळ पार करून!! निसर्गाने मुळात येथे घडविले तेच एवढे चंड प्रचंड! त्यात अत्यंत मजबूत व दुर्गम अशा एक दोन नव्हे तर साठ किल्ले जंजिऱ्यांची भर घातलेली.

सह्याद्रीतल्या दऱ्या आणि खोरी ज्यांनी पाहिली असतील त्यांना आजही ह्या निसर्गदत्त कवचकुंडलांची कल्पना करता येईल. त्यातच साठ दुर्गम किल्ले जंजिऱ्यांची भर घातल्याने हा साराच प्रदेश त्या काळी किती अधिक वज्रदेही व स्वयं-सुरक्षित झाला होता याची नेमकी कल्पना फक्त शिवकाळातील युद्धकला विशारदांनाच येण्यासारखी होती.

शिवकाळातील प्रत्येक मोठ्या किल्ल्यावर अदमासे पंधराशे ते दोन हजार माणसे युद्धकाळी शिबंदी म्हणून असत. यावरून साठ किल्ल्यांच्या शिबंदी शक्तीचा अंदाज बांधता येतो. शिवाजी राजांच्या, त्यावेळच्या राज्याचे अंदाजी क्षेत्रफळ सतरा हजार चौरस मैल धरल्यास दर सोळा मैलावर एक किल्ला असा हिशोब येतो. साधारणपणे कोणत्याही किल्ल्यासभोवतालचा वीस मैलांचा टापू किल्ल्याच्या आहारी असतो असे धरून चालल्यास शिवाजी राजांच्या वतनातील प्रत्येक चौरस हात जमीन किती कडेकोट बंदोबस्ताने भारली होती याची कल्पना येते. जंजिऱ्यांचा उल्लेख ओझरता वाटला तरी वतनाचे हे सागरी अंगही उघडे नसून तेवढेच संरक्षित आहे असे स्पष्ट बजावणारा आहे.

सारांश वतनाचा प्रांत पहाडी; संरक्षणास स्वतःच सिद्ध. त्यात किल्ले जंजिऱ्यांचा कडेकोट बंदोबस्त जमा केला की, वतनाच्या संरक्षण क्षमतेचा नेमका नसला तरी अंदाजी हिशोब करता यावा. अंदाजी अशासाठी, की जाणूनबुजून ही लष्करी माहिती: म्हणजे एखाद्या हिमनगासारखी. ती देण्यात येते त्याच्या अनेकपट लपवि-लेली असते. संरक्षणाची क्षात्र प्रतिमा समर्थपणे उभी करणाऱ्या प्रेरणेने हा संकेत पाळला नसेल असे समजण्याचे कारण नाही. किंबहुना सारे संकेत सावधानतेने पाळूनच तिने संरक्षण प्रतिमेची अभेद्य मूर्ती उभी केली, ती आक्रमणाचे अखेरचे आव्हान स्वीकारण्या-करिता. या प्रचंड प्रतिमेचा आकार-विस्तार, व्याप आणि वजने यांचा अंदाज घेतल्यास, आक्रमणशक्तीच्या मुकाबल्यात ही प्रतिमाही तेवढीच धीट धिप्पाड उभी करण्यात आली होती याची जाणीव होते.

या अभेद्य प्रतिमेपुढेच विजापूरचा अफझलखान व मोगल अमीर-उल-उमरा यांच्या सारख्या प्रचंड आक्रमकांचे सारे प्रयत्न व पराक्रम निष्प्रभ ठरले. अखेरच्या निकाली झुंजात त्यांचीच वाताहत झाली. काही मृत्यू पावले, काही मरणप्राय पराभव व नामुष्की घेऊन परत गेले. अखेर निग्रही संरक्षणापुढे, केवळ बलदंड आक्रमणाला नमावे लागले; आक्रमणाला आपली ढाल खाली ठेवावी लागली.

पत्ररूपी आविष्कारातील प्रत्यक्ष संघर्ष वर्णनाचे पर्व संपले. या झुंजीत संरक्षण प्रतिमेने दरवेळी आक्रमणाचा पराभव करूनही अखेरपर्यंत आपले सौजन्य सोडले नाही हे ध्यानात घेतले पाहिजे. या उलट आक्रमणाचे वैय्यर्थच दरवेळी आक्रमकांच्या नजरेस आणून देण्यात आले आहे. "बादशहाला वारंवार खोटे लिहूनही अखेर परि-णाम आक्रमकांची नामुष्की हाच झाला... असे मर्यादेने सांगण्यात आले. "सत्यकथनाचे मूळ जे सत्य तेच त्यांनी (आक्रमक सरदारांनी) आपल्या हातून घालविले होते, याचा त्यांनी कधी विचारच केला नाही— असे आश्चर्य प्रकट करण्यात आले. 'अफझल-खानाचा येथे नाश झाला. हा प्रत्यक्ष घडलेला इतिहास त्यांनी (आक्रमक सरदारांनी) बादशहाला का कळविला नाही?"—या-बद्दल खेद प्रदर्शित करण्यात आला. अखेर "अमीर-उल-उमराला



अनुक्रमणिका

पराभव पत्करून व शरमिंदे होऊन परत जावे लागले, ही गोष्ट गुप्त नसून सूर्यप्रकाशाहूनही स्वच्छ आहे, हे जाणत्यांनी ध्यानात घ्यावे," अशी सर्व विचारवंताना विनंती करण्यात आली. आम्ही आपल्या पराक्रमाने आक्रमकांचा पराभव केला अशी अहंमन्य भूमिका येथे नाहीच. या उलट येथे आलेल्या आक्रमकांचा पराभव, स्वसंरक्षणात स्वयंभू असलेल्या येथल्या स्वयंसिद्धा भूमीने, म्हणजेच या वतनाने, या प्रदेशाने केला असेच प्रतिपादन करण्यात आले आहे. आणि या प्रतिपादनातील सूचना स्पष्ट आहे. या भूमीला स्वसंरक्षण हे स्वयं आवश्यक. तो तिचा प्रकृती-धर्म. आणि जो भूमीचा प्रकृती-धर्म तोच त्या भूमीतील जीव-जड सृष्टीचाही धर्म; या भूमीला जननी म्हणणाऱ्या मानवाचाही धर्म!! या धर्माचा 'मातृभाषेत' उच्चार म्हणजेच या पत्रातील शिवाजी राजांचे स्पष्ट व प्रकट उद्गार–

"ईं कसरा मुहाफिज़त ए वतन खुद लाज़िम"–मला वतनाचे संरक्षण स्वयं आवश्यक.

हे महत्त्वाचे वाक्य म्हणजे या आविष्कारातील अंतर्गत संघटनेचा दुसरा घटक. खरं म्हणजे संरक्षण प्रतिमेचेच हे स्वगत; परंतु वदविले गेले शिवाजी राजांच्या तोंडून.

संरक्षण प्रतिमेची प्रचंड पराक्रमी प्रतिमा उभी करून हे महत्त्वाचे वाक्य राजांच्या तोंडून –आणि तेही मोठ्या अदबीने–वदविण्यात प्रेरणेने कमालीचे योजना चातुर्य व औचित्य दाखविले आहे. शिवाजी राजे हे वाक्य बोलले, तरी या वाक्यातील प्रत्येक शब्दावर ठसा आहे तो प्रेरणेचा. आक्रमकांचा सपशेल पराभव झाल्यानंतर उच्चारले गेलेले हे वाक्य कटाक्षाने संयमी आहे. शिवाजी राजांनी ते "जितं मया"च्या आवेशात उच्चारले असते तर ते केवळ उद्धत आवेशी ठरले असते. परंतु ते प्रेरणेला सुतराम मान्य झाले नसते. कारण उथळ, उद्दाम आवेशाला अथवा औद्धत्याला तिच्या योजनेत स्थानच नाही. त्या परिस्थितीत प्रचंड विजयानंतरही उन्मादाने संयम सोडणे अप्रासंगिकच होते. शिवाजी राजांच्या तोंडचे हे वाक्य कटाक्षाने अदबशीर आहे ते यामुळेच. किंबहुना या साऱ्याच आविष्का-कारात प्रेरणेने लावलेली ही संयमाची शिस्त वाखाणण्यासारखी आहे. सुसंस्कृत आदब व पराक्रमी आत्मविश्वास यांचा मनोहर मिलाफ या आविष्कारातील अक्षरांच्या कानामात्रेतूनही दरवळतो असे मागे म्हटले ते या शिस्तीमुळे.

आम्ही आक्रमकांचा पराभव केला अशी अहंपणाची भाषा येथे कोणाचीच नाही, शिवाजीराजांची तर नाहीच. किंबहुना स्वतःच्या पराक्रमाबद्दल येथे बोलणेच नाही. स्वतःच्या विजया-पेक्षा आक्रमकांच्या पराभवाचे वर्णन येथे अधिक आणि तेही अत्यंत काव्यपूर्ण परंतु समर्पक भाषेत–

"आक्रमकांचा घोडा जगात सर्वत्र दौडू शकत नाही; काही जागा अशाही असतात की त्या ठिकाणी आक्रमकाला आपली ढाल खाली ठेवावी लागते" इ. इ.

हे सारे लक्षात घेतले की वाटते, प्रेरणेचा हा साराच आवि-ष्कार जेवढा बोलका आहे त्यापेक्षा शतपटीने तो मुग्ध आहे. प्रत्यक्ष सांगितले त्यापेक्षा सुचविलेले कितीतरी अधिक!!!

प्रेरणा आतापर्यंत विनम्र, संयमी राहिली ती दुबळी म्हणून नव्हे, तर शिस्त म्हणून, एक धोरण म्हणून. परंतु ती अकारण आणि अस्थानी विनम्र रहात नाही अथवा अवास्तव संयमही दाखवीत नाही हे या आविष्काराच्या तिसऱ्या घटकात म्हणजे 'सूचनेत' दिसून येते.

या 'सूचनेच्या' घटकात भावी संघर्षाचेच भीषण चित्र रंगविण्यात आले आहे; म्हणजेच भविष्यात संरक्षण प्रतिमा कोणते विराट रूप धारण करणार याची सूचना आहे. साऱ्या आविष्कारात सूचनेचे हे शेवटचे कलम विलक्षण बोलके व निर्भीड आहे. प्रेरणेचे खरे सामर्थ्य, कर्तृत्व, आत्मविश्वास व निर्भयवृत्ती यांची प्रचीती येते ती या परिच्छेदातील स्पष्ट व परखड उद्गारात." ईं कसरा मुहाफिज़त ए वतन खुद लाज़िम" असे अदबीने सांगणारी प्रेरणाच या शेवटच्या परिच्छेदात सूचनेचे स्पष्ट व धीट बोल दुर्दम्य आत्म-विश्वासाने ऐकवते. या निर्भीडपणातही उद्दामपणा अथवा औद्धत्य नाही हे लक्षात घ्यावयास हवे. "माझ्या प्रिय वतनावर व माझ्या-सारख्या एकीकडे रहाणाऱ्या व्यक्ती विरुद्ध, शत्रुत्व घेऊन येणाऱ्या कोणाही आक्रमकाच्या मनातील दुष्ट हेतूची कळी अजून तरी कधी पुरती उमलली नाही," असे ती आत्मविश्वासाने सांगते पण याचे श्रेय स्वतःकडे न घेता ते तिने दिले सर्वशक्तीमान प्रभूला, त्याच्या अनन्य कृपेचा दाखला देऊन."

* *

प्रेरणा विनयशील असते; तेवढीच ती निर्भयही होते. ती शालीन किती असते हे आपण पाहिले, ती निर्भय किती होते याचा प्रत्यय आक्रमकांना दिलेल्या शेवटच्या निर्भीड सूचनेत येतो. आविष्काराची पातळीच येथे निर्भर उंचावली आहे. या निर्भय उंचीवरून उड्डाण करणाऱ्या प्रेरणेची झेप किती पल्लेदार व धाडसी झाली होती याची कल्पना तिने रंगविलेल्या रक्ताच्या भीषण समुद्रावरूनच येते. भावी आक्रमकांना ती स्पष्ट बजावते–

"सूज्ञांनी या रक्ताच्या समुद्राचे भय बाळगणेच इष्ट, कारण (ह्या समुद्रातून) कोणालाही आपली नाव सुरक्षितपणे नेता आली नाही."

संरक्षणापायी सांडल्या जाणाऱ्या रक्ताचा अफाट भीषण समुद्र व त्यात दिशाभूल झालेली आक्रमणाची बापडी नाव. संरक्षण जेवढे विराट झाले तेवढेच आक्रमण क्षुद्र झाले. संरक्षण प्रतिमेचे 'घोररूपमिदम्' पाहिले की ही प्रतिमा शेवटी, आकार अवकाश, व्याप व वजने यांच्या हिशोबात किती अफाट मापांनी महान झाली होती याची जाणीव होते.

या पत्राचे आवाहन बुद्धीमंतांना व दूरदृष्टी विचारवंतांना आहे. उद्दाम, सैनिकी सत्ताधीशांऐवजी शांत-सूज्ञ मुत्सद्यांना आहे.

अनुक्रमणिका






त्यांनी, राजकारणी 'तात्कालिक' दृष्टीने विचार न करता, वर्तमानाच्या पलिकडे जाऊन अधिक शाश्वत मूल्यांचा विचार करावा हा उद्देश. वतनाबद्दलच्या अस्मितेची व वतनाच्या संरक्षणाची जाणीव ही कोणत्याही अर्थाने तात्पुरती, उपरी, अथवा जुजबी नसून, ती मूलभूत, वास्तवनिष्ठ व जन्मसिद्ध आहे हे पटविण्याचा उद्देश. या वैचारिक भूमिकेचे प्रतिपादन व समर्थन कटाक्षाने सुसगत व समर्पक करण्यात आले असून, विचारांची संगती स्पष्ट व तर्कनिष्ठ आहे. निःसंदिग्धपणा, नेमकेपणा हे या आविष्काराचे लक्षणीय गुण आहेत. पाल्हाळ तर कोठे नाहीच, उलट अल्पाक्षरत्व व सूचकत्व याबाबतीत हा आविष्कार एक आदर्श आहे.

सत्यनिष्ठेबद्दल विशेषत्वाने आग्रह आहे. आक्रमकांनी सत्याचा वेळोवेळी विपर्यास केल्यामुळेच त्यांना (आक्रमकांना) पराभव व नामुष्की पत्करावी लागली हे स्पष्ट दाखवून देऊन आक्रमकांनी केलेल्या सत्यापलापाबद्दल खेद प्रदर्शित करण्यात आला आहे. सत्याइतकीच ईश्वरी निष्ठाही प्रखर आहे. सर्वशक्तिमान परमेश्वराचा आपल्यावर अनुग्रह आहे याबद्दल दृढविश्वास आहे, तसाच ह्या ईश्वरी अधिष्ठानाचा सार्थ अभिमानही आहे.

तर्कनिष्ठ व विचारवंतांना आवाहन करणारी असली तरी विचारांची मांडणी प्रतिपादन पंडिती, तर्ककर्कश, अथवा रुक्ष नाही. उलट सूचक वाक्प्रचारांनी व समर्पक दृष्टांतांनी सारे विवेचन लालित्यपूर्ण करण्यात आले आहे. येथे उद्धृत करण्यात आलेल्या काव्यपंक्ती समर्पक तर आहेतच, शिवाय आविष्कारातील सारे दृष्टांत कल्पनारम्य असून विशेषत्वाने चित्रवाणाचे आहेत. समर्थ विचार लालित्यपूर्ण रीतीने मांडण्याचा हा आविष्कार एक आदर्श आहे.

बुद्धीवंतांना, विचारवंतांना आवाहन; सत्यनिष्ठा, ईश्वरी अनुग्रह, त्याचप्रमाणे निरनिराळे चित्रवाण दृष्टांत, सूचक वाक्प्रचार व संकेत इत्यादी या आविष्कारातील वेगवेगळी, दृकप्रत्ययकारी, मनोगम्य व भावसंवेद्य मूल्ये आहेत. ही मूल्ये वेगवेगळ्या शक्तीभाराची आहेत. आविष्काराच्या रचनाबंधातील वेगवेगळ्या आकार-अवकाशांची, स्थिती-गतीची, व्याप–वजनांची जाणीव देणारी; अंतर्गत संघटनेतील वेगवेगळ्या आकृतीबंधांना संघटित करणारी; वेगवेगळ्या वजनांचे तालतोल संतुलित करणारी; आविष्काराच्या अंतर्गत रचनाव्यूहाची दृक व भावसंवेद्य आकृती सार्थ करणारी.

रचनाव्यूहाच्या या 'आकृतीबंधा'चाच आता आपल्याला विचार करावयाचा आहे.

रचनाव्यूहाचा आकृतीबंध मनावर ठसल्यानंतर सर्वप्रथम आपणास जाणवतो तो या आकृतीचा शक्तीशाली घाट. सारा आकृतीबंध साकल्यानेच नव्हे तर त्यातील अंतर्गत संघटनेचे निरनिराळे घटक व आकार अवकाशांच्या व व्याप वजनांच्या वेगवेगळ्या दाट-दाबांचा सूक्ष्म तपशीलही या शक्तीने पूर्णपणे भारलेला, झपाटलेला वाटतो. किंबहुना 'शक्ती' हे या आकृतीबंधाला घडविणारे, तिला घाट देणारे, तिचा तालतोल नियत करणारे एक प्रभावी तत्त्व असल्याचे जाणवते. हे शक्ती तत्त्व सुस्त अथवा उदास नाही, तर ते चेतनायुक्त व गतिमान आहे. शक्ती व गतिमानता हे या तत्वाचे स्थायीभाव आहेत. म्हणूनच या शक्तीला आपण चैतन्यपूर्ण शक्ती 'चित्शक्ती' म्हणू.








शिवाजी राजांच्या पत्राचा, प्रेरणेने संकल्पिलेल्या आकृती-बंधाचा घाट शक्तीशाली वाटतो याचे कारण तो आकृतीबंध या चित्शक्तीने भारला गेला आहे म्हणून.

चित्शक्ती म्हणजे निर्बुद्ध निर्घृण पाशवी शक्ती नव्हे. पाशवी शक्ती ही केवळ विध्वंसक, संहारक शक्ती! या बेलगाम व बेगुमान शक्तीकडून निर्हेतुक निरर्थक संहाराशिवाय कोणतेही विधायक कार्य घडविले जाणे अशक्य. या उलट चित्शक्ती म्हणजे विधायक कार्य घडविणारे प्रेरणेचे नियंत्रित प्रभावी साधन. शक्ती, गतिमान शक्ती हाच या साधनाचा विशेष गुण; आणि शक्ती हेच साधन झाल्यामुळे, निर्माण होणारी आकृतीही शक्तीनेच भारली जावी; तिचा घाट, तिची अंतर्गत संघटना या शक्तीच्या गुणधर्मानीच झपाटली जावी; आणि पर्यायाने या चित्शक्तीच्या आणि तिच्या आनुषंगिक गुणांच्या दृक् व भाव संवेदनावरूनच, आकृतीबंधाचे सौष्ठवसूत्र ठरावे यात आश्चर्य नाही. चित्शक्तीमुळे सिद्ध झालेल्या या सौष्ठव शैलीला, चित्शक्ती सौष्ठव शैली अथवा शक्तीसौष्ठव शैली म्हणू!

चित्शक्ती सौष्ठव शैलीप्रमाणेच आकृती रचनेचे आणखी एक वेगळे सूत्र आहे. ते म्हणजे समतोल-संवाद सूत्र अथवा शैली. या शैलीन्वये आकृतीचा घाट व तिच्या अंतर्गत घटकांचे संघटन, समतोल व संवाद या तत्त्वांनुसार करण्यात येतात. अर्थात चित्-शक्तीप्रमाणेच समतोल संवाद सूत्रही आविष्काराकरिता म्हणजेच आकृतीबंधाची रचना करण्याकरिता एक साधन म्हणून प्रेरणेनेच निवडलेले असते. या शैलीन्वये घडविलेल्या आविष्कारात, म्हणजे आकृतीबंधात, समतोल संवाद तत्त्वांच्या व त्या अनुषंगाने येणाऱ्या इतर गुणांच्या दृक् व भाव संवेदनावरूनच त्या आकृतीबंधाचे सौष्ठव सूत्र ठरते. शक्तीसौष्ठव शैली व समतोल-संवाद शैली अशा आकृती रचनेच्या दोन शैली आहेत.

शक्तीसौष्ठव शैली व समतोल-संवाद सौष्ठव शैली ह्या दोन्हीही मूळ प्रेरणेची, आविष्कार निर्मितीची साधने आहेत हे लक्षात घेणे आवश्यक आहे. शक्ती व समतोल-संवाद ही दोन्हीही तत्त्वे प्रभावी असली व त्यांचे त्या त्या शैलीतील कार्य महत्त्वाचे असले तरी ही दोन्ही तत्त्वे व त्यांच्या शैली साधनरूप आहेत; स्वतःहून ही तत्त्वे अथवा शैली कोणताही आविष्कारपूर्ण आकृतीबंध घडवू शकत नाहीत. प्रेरणेने आविष्काराकरिता योजिलेले साधन म्हणूनच त्यांचा उपयोग आहे. आविष्काराचे एक तांत्रिक साधन म्हणून; रचनाशास्त्राचे एक सूत्र म्हणून.

वेगवेगळ्या शैलींची ही साधने प्रेरणेला आयती तयार मिळत नाहीत. ती प्रेरणेच्या स्वतःच्या भावविश्वातूनच सिद्ध करावी लागतात, अथवा होतात. एवढेच नव्हे तर इतर कोणत्याही भाव-विश्वात तयार झालेल्या, प्राचीन अथवा प्रचलित शैली, मग त्या कितीही समृद्ध अथवा सिद्ध असोत, प्रेरणेला स्वतःच्या आविष्का-रास योग्य वाटत नाहीत. एवढा या शैलींचा व प्रेरणेच्या भावविश्वांचा जिव्हाळ्याचा संबंध असतो.

प्रेरणेचे भावविश्व व तिची शैली यांचा निकटचा संबंध लक्षात घेतला की शक्तीसौष्ठव शैली व समतोल-संवाद शैली या दोन्हीही शैलीचे स्वरुप प्रेरणेच्या भावविश्वाच्या एकंदर स्वरुपावरच अवलंबून रहावे हे उघड आहे. प्रेरणेने शक्ती सौष्ठव शैलीत आविष्कार साकारला असेल तर प्रेरणेच्या भावविश्वात शक्तीसौष्ठव शैलीचीच सिद्धता झाली होती अथवा होऊ शकत होती असे समजणे रास्त होईल. तीच गोष्ट समतोल संवाद सौष्ठव शैलीची. स्वभावभेदामुळे प्रेरणेच्या भावविश्वात या दोन्हीही शैली एकाच वेळी सारख्याच तयारीने सिद्ध झालेल्या सहसा आढळत नाहीत. तर कोणत्यातरी एका शैलीचा प्रभाव प्रेरणेच्या भावविश्वात अधिक असल्याचे आढळते. कारण प्रेरणेचे भावविश्व या दोन्हीही शैली एकाच वेळी सारख्या प्रभावी स्वरुपात सिद्ध करण्यास 'समर्थ' व 'समतोल' नसते म्हणून. ते जेव्हा असे समर्थ व समतोल होते–आणि असा योग कधी काळी येतो–त्यावेळी ह्या दोन्ही शैलींच्या सहिष्णु साहचर्यातून, प्रेरणेने घडविलेला आविष्कार, इतर आविष्कारांहून केवळ वेगळाच नव्हे तर अलौकिक ठरतो. तो केवळ आविष्कार नसतो तर तो एक 'अवतार' असतो. प्रेरणेच्या अखंड गतिमान भावविश्वात 'संभवामि युगे युगे' असा तो चमत्कार असतो.

पण हे चमत्कार आपला आजचा विषय नाही. त्याचप्रमाणे समतोल-संवाद सौष्ठव शैलीचा विचारही नंतर करावयाचा आहे. शिवरायांच्या पत्राच्या संदर्भात आज विचार करावयाचा आहे तो चित्शक्तीसौष्ठव शैलीचा–शिवकालीन भावविश्वात सिद्ध झालेल्या विशिष्ट आविष्कार शैलीचा.

शक्तीसौष्ठव शैलीचे हे घराणेच वेगळे आहे. शक्ती आणि तिच्या अनुषंगाने गती हे ह्या शैलीचे प्रमुख भाव. शक्तीचा साक्षा-त्कार आविष्काराच्या आकृतीबंधांतील वेगवेगळ्या घटकांतून जाणवतो; दृक् व भाव संवेदनांच्या विविध रूपांतून प्रकटपणे अथवा सूचनेने प्रतीत होतो. आविष्काराच्या आकृतीबंधांतील आकार-अवकाश व वजने-व्याप ही सारी शक्तीसौष्ठवाच्या धारणे-चीच असतात व त्यांची वेगवेगळी मापे व शक्तीभार शक्ती-सौष्ठवाच्या कोष्टकानेच मोजली जातात.

शक्तीतत्त्वामुळे आकृतीबंधाचा बांधा घाटाने ठसठोंबस होतो. आकृतीबंधाच्या अंतर्गत संघटनेतील लहान मोठे आकार अवकाश घनभावाचे व शक्तीभाराचे असतात. घनभावाचे व शक्तीभाराचे असले तरी ते जडभरती व सुस्त नसतात; उलट स्थिर असले तरी चित्शक्तीच्या चैतन्याने भारलेले व गतिशील असतात.

शक्तीसौष्ठव शैली स्वभावतःच आवेशी व गतिमान असल्या-मुळे तिचा स्पर्श झालेला कोणताही आकृतीबंध शक्तीने व चैतन्याने भारला जाणे अपरिहार्य आहे; मग तो आकृतीबंध लौकिक अर्थाने




अथवा रूपाने कोणताही असो! लहान असो, थोर असो, मृदु असो. कठोर असो, अक्षरात लिहिलेला असो, रंगात चितारला असो, दगडात कोरला असो, विटा मातीने बांधलेला असो, अथवा तालसुरात चीज स्वरूप पावलेला असो. शक्तीसौष्ठव शैलीने घडविला गेलेला आकृतीबंध पिंड प्रकृतीने सशक्त व गतिमानच असावयाचा. वळियाचा अंगसंग झालेला, वास्तवाचे, चित्शक्तीने भारलेले 'आगळे' रूप दाखविणारा. शिवाजी राजांच्या पत्रावरून हीच गोष्ट अधिक स्पष्ट होते. हे पत्र कोणत्या भूमिकेवरून लिहिले गेले हे आपण पाहिलेच. एका बलदंड आक्रमक सत्तेसमोर स्वसंरक्षणाचे तर्कनिष्ठ विचार स्पष्टपणे पण अदबीने मांडणारा हा लेख आहे. लौकिकदृष्टया आर्जवी व विनंतीवजा. परंतु चित्शक्तीने भारलेल्या शक्तीसौष्ठव शैलीत लिहिलेला हा 'विनंती लेख' सुद्धा कसा एक 'वळें आगळा' आविष्कार झाला आहे याचे हे उत्तम उदाहरण. सारांश चित्शक्तीचा स्पर्श ज्या ज्या प्रतिमेला होतो ती ती प्रतिमा "वळियाचा अंगसंग" झाल्यागत सर्वस्वी झपाटली जाऊन, तिच्या लौकिक स्वरूपाहून वेगळयाच रूपात ती साकार होते.

शिवाजी राजांचे हे पत्रच नव्हे तर शिवकाळातील प्रत्येक आविष्कार या चित्शक्तीने भारलेला व म्हणूनच इतर काळांपेक्षा 'धीट' सौष्ठवाचा वाटतो: शिवकाळात हे आगळे रूप पहाडाला मिळाले तसे ते फुलालाही मिळाले." 'चंचळ गुप्त गंगेच्या' वर्णनात ते जसे दिसते तसेच एका 'वहाळाच्या' कौतुकातही ते जाणवते. शिवरायांनी एका 'नादान' अधिकाऱ्याच्या, संतापून केलेल्या 'निषेधात' तर ते आहेच पण रामदासांनी ग्रंथारंभी केलेल्या गणेश 'नमनातही' ते आहे. तत्कालीन पोवाडयातील सैन्य वर्णन चित्शक्तीने भारले गेले तर स्वाभाविकच आहे; रामदासांच्याच 'गिरीहून दाटल्या फौजा । मेघ उठले लोक काजा ।गर्ज गर्जो तडक विजा । वायोवळें ।। यांतील आवेशही समजण्यासारखा आहे, परंतु तत्कालीन तुकारामांच्या गाथेतील दिंडीही कळि काळाला भीती घालणारे 'वैष्णवदळ' व्हावी, आणि तिने 'वेढा वेढा रे पंढरी । मोर्चे लावा भीमातीरी ।' अशी आरोळी ठोकावी हा या चित्शक्तीचाच सार्थ प्रभाव आहे. 'भांडण राजाचे गाईन' असा कडाका गाणाऱ्या शाहिराची 'मशाल' व यथार्ततेच्या जिद्दीने लिहिलेली वामन पंडितांची 'दीपिका' या दोन्हीही चित्शक्तीच्या एकाच ज्योतीने पेटवलेल्या, उजळलेल्या. रायगडाच्या प्रचंड वास्तुमात्राला ज्या शक्तीने बांधलेसांधले•तिनेच गड बांधणाऱ्या स्थपतीचे नाव लिहिले आपल्या खास शक्तीसौष्ठव शैलीने—स्पष्ट, सुढाळ, ताज्या टपोऱ्या अक्षरात. सारांश शिवकालात ज्या कोणी जे काही लिहिले, उच्चारले, गायले, चितारले, कोरले अथवा बांधले ते सारे चित्शक्तीच्या अंगाने, चित्शक्तीच्या अवसानाने.

या शक्तीतत्त्वाचा प्रभाव दृक व भाव संवेदनांच्या किती वेगवेगळया सूचना संकेतांनी विशद होतो याची कल्पना शिवरायांच्या पत्रातील आक्रमण व संरक्षण या दोन्ही प्रतिमांच्या उभारणीत येते. आक्रमण प्रतिमा तर प्रत्यक्ष वर्णन केलेलीच आहे. ती कटाक्षाने समर्थ दाखविण्यात आली असून तिचे सामर्थ्य व गतिमानता प्रकट आहेत; परंतु संरक्षण प्रतिमेचे अप्रत्यक्ष व केवळ मनोगम्य सामर्थ्य ह्याहूनही विशाल आहे. केवळ भावसंवेद्य असलेली ही प्रतिमा, आकार-अवकाशांनी जेवढी प्रचंड आहे तेवढीच ती चैतन्यपूर्ण व जिवंत आहे. तिच्या विशालपणात, तिच्या सामर्थ्यात चैतन्य पुरेपूर जाणवते—तिचा कणन्‌कण चित्शक्तीच्या दाबाने भारलेला आहे. तिच्या विशाल आकृतीबंधातील तोल शक्तीच्या वेगवेगळया





अनुक्रमणिका

वजनांनीच संभाळला आहे, आकार अवकाशांच्या धीट धिप्पाड अंगानी सावरला आहे.

शिवकालीन मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास, वामन पंडित यांचे वाङ्मयीन आविष्कार शक्तीसौष्ठव शैलीतलेच कसे आहेत हे स्पष्ट करणारी अनेक उदाहरणे या साऱ्यांच्या साहित्यांतून काढून देता येतील. शिवकाळातील नेमक्या याच लेखकांचा दाखला अशाकरिता घ्यावयाचा की शिवकालीन भावविश्वातूनच, यांचे साहित्य निर्माण झाले आहे म्हणून. शिवकालीन भावविश्वाचा वाराही न लागलेले पंडित साहित्यिक शिवकाळातही होतेच. यमक अनुप्रासांची चोथा झालेली जीर्ण परंपरा चालविणारे; अतिशयोक्ती, अद्‌भुताची मिकार मुतावळ जागवणारे; चित्र व कूटकाव्यांचे षण्मासीचे वायदे करून निरर्थक कलापव्यय करणारे हे तत्कालीन साहित्यिक, मराठीपेक्षा प्राचीन संस्कृतच्या जुन्या जीर्ण भावविश्वातच सर्वस्वी मशगुल होते. मराठीत ते लिहीत होते ते, मराठीत नवे काही करावयाचे म्हणून नव्हे, तर प्राचीन संस्कृत साहित्यातील सारे जुने संकेत व जीर्ण परंपरा मराठीत लीलया आणण्याच्या अट्टाहासाने. हे पंडित कवि शिवकालात जगत होते एवढेच; एरव्ही शिवकालीन भावविश्वाशी त्यांचा सुतराम संबंध नव्हता. त्यामुळेच शिवकालीन भावविश्वातून निर्माण झालेल्या आविष्कारांच्या संदर्भात या साहित्यिकांच्या साहित्याचा विचार करणे अप्रस्तुत ठरेल.

शिवकालीन भावविश्वाचा वारा प्यालेले वाङ.मय म्हणजे शिवकालीन शाहिरी वाङ्मये. हे तर अक्षरशः शक्तीसौष्ठव शैलीने झपाटलेले. 'दावा हेवा जाण अखेर संग्रामाच्या गति' अशी निष्ठा असलेला शिवकालीन पोवाडा, म्हणजे कोणत्या तरी 'मांडणाचे' गाणे. गाईन राजाचे मांडण, गाईन वजिराचे मांडण, गडमी राजाचे गाईन; अफझलखान शिवाजी दोनी–भांडती दोनी धुरा । असे हे मांडण राजाचे वजिराचे, दोन झुंजार योध्यांचे. मांडणाचा कडाका गाणाऱ्या या गोंदळ गीतात शक्ती हीच अधिष्ठात्री देवता. शक्तीसौष्ठव शैलीच्या अस्सल ग्रामीण घाटाचे दर्शन येथेच घडते. शब्द, वाक्प्रचार, कल्पना, दृष्टांत यांच्या ग्रामीण थाट घाटांतूनच पोवाडा फुलतो तो शक्तीच्या गावरान अवसानाने आणि ग्रामीण ठसठोंवस रूप घेऊन. अवसानाचा धुंद मंडारा उधळणाऱ्या या कवनातील सारे भावविश्व चैतन्याने मस्त झालेले. येथे कोणी 'लोहगड मस्तीत झुलतो' एखाद्या हत्तीसारखा; तर कुठे 'हुडे दुर्गांचे खण मस्त होऊन' उंच गगनाला झुलवा देतात. येथे सिंहगड म्हणजे वाघाचा विक्राळ जवडा वाटतो तर अफझलखान महाभुजंग होतो. आणि 'दीड गाई, दीड शेळी आणि सव्वामण तांदुळाचा, वेळेस आहार असलेला उदेमान, तेल्याची पहार मनगटावर घालून तिची सरी करतो; चांदवडी रुपया दोन वोटांनी तोडतो.' पोवाड्यातला शिवाजी राजा 'सरजा' म्हणजे सिंह खरा, परंतु शाहीर सांगतो, 'नाव घेता सिंहगडाचे, राजा थरथरा कापतो.' तानाजी सुभेदाराचे नाव ऐकताच राजमाता जिजाबाई कशी हसली ? कवि सांगतो 'बाई गदगदा हासली.'

या कवनातील शब्द, वाक्प्रचार, प्रतिमा, कल्पना, घटना सारे रोजच्या ग्रामाणी व्यवहारातले; नित्याच्या परिचयाचे. काही वर्णने व दाखले तर कमालीचे घरगुती. प्रतापगडाहून, उगवते बाजूला वारामावळ जुनराखाली, पुण्याच्या तोंडाला, जेजुरीच्या बारीला, जिजाबाईने सिंहगड पाहिला त्यावेळी तो तिला कसा दिसला ?– 'नवे कोंबडीचे अंडे । ऐसा किल्ला झळकला–' आणि शिवाजी राजांना तातडीचा निरोप गेला–'जेवावे राजगड किल्ल्याला । अंचवावे प्रतापगडला ।।' इ. इ. ग्रामीण व्यवहारातले असले तरी ह्या आविष्काराचे भावविश्व–बारीक तपशीलाने सुद्धा शिवकाळाशी बांधलेले आहे हे त्यातील संदर्भावरूनच कळते.

कोणत्याही अर्थाने ही वर्णने सांकेतिक अथवा काल्पनिक नाहीत, हे ध्यानात घेतले पाहिजे. नेहमीच्या व्यवहारातील वस्तू, घटनांनाच आविष्काराच्या शक्तीसौष्ठव तंत्राने शक्तीचे चार पीळ अधिक देऊन कसदार बनविल्यामुळे, वस्तू व घटना आगळ्याच स्वरूपात साकार होतात. जिजाबाई, साधी हसत नाही तर 'गदगदा' हसते. तत्कालीन भावविश्वातून निवडलेल्या वस्तूनाच आगळा शक्तीसौष्ठवी घाट देणे हे शक्तीसौष्ठव तंत्राचे खास वैशिष्टच! ही निवड प्राचीन संकेतांच्या जीर्ण परंपरेतून करण्यात येत नाही त्याचप्रमाणे केवळ कल्पनाजन्य सृष्टीतूनही नाही. प्राचीन संकेत जीर्ण व निरर्थक झाल्यामुळे त्यांचे प्रचंड भांडार हाताशी असूनही, तत्कालीन आविष्काराच्या दृष्टीने ते सर्वस्वी निरुपयोगी ठरते. किंबहुना शक्तीसौष्ठव शैलीला तर ते निर्जीव व निःसत्त्वच वाटते. कल्पनासृष्टीतून केवळ काल्पनिक निर्माण करावे तर रसिकांशी संवाद साधणे कठिण. अशा परिस्थितीत स्वतःच्या भावविश्वासातल्या प्रत्यक्ष अथवा संवेद्य वस्तूची अथवा घटनेची निवड करून आविष्कारात त्यांनाच प्रतिमारूप देणे अधिक प्रत्ययकारी ठरते. हे रूप शक्तीसौष्ठव तंत्राने दिले गेल्यामुळे ते शक्तीनिष्ठ थाटघाटाचे ठरावे हे स्वाभाविक व सुसंगत. शक्तीनिष्ठ तंत्र व भावविश्व यांचे संबंध किती जिव्हाळ्याचे असतात हे यावरून अधिक स्पष्ट होते. स्वतःच्याच भावविश्वातून प्रतिमायोग्य वस्तू घटनांची निवड करून त्यांना आविष्कारात शक्तीसौष्ठव घाटाचे नेटके रूप देणे हेच शिवकालीन शक्तीसौष्ठव शैलीचे तंत्र होते म्हणूनच रामदास म्हणतात, 'शक्तीने नेटका प्राणी' या भावविश्वातील साऱ्या आविष्कारात प्राणीमात्राला अथवा वस्तूमात्राला 'नेटकेपणा' यावयाचा तो शक्तीने; इतर कोणत्या गुणांमुळे नव्हे !

आविष्काराकरिता तत्कालीन भावविश्वाचाच आधार घ्यावयाचा हे धोरण ठरल्यामुळे त्या भावविश्वातील सारे वस्तुमात्र हे सामुग्रीरूप होणे अपरिहार्य आहे. भावविश्वातील ह्या वस्तुमात्राचे स्वरूप काय असेल? जुने जीर्ण संकेत–त्यांच्या जुनेपणामुळे–येथून हद्दपार झाले असतील अथवा ते निरुपयोगी म्हणून अडगळीत पडले असतील. अनेक नवे संकेत रूढ होऊ पहात असतील–त्यापैकी काही झालेही असतील. या नव्या संकेतात सर्वच स्वकीय असतील

असेही नव्हे ! एखाद्या परकीय संस्कृतीचे दीर्घ साहचर्य दरम्यान घडले असल्यास–इतर अन्य काही कारणाने काही अथवा अनेक परकीय संकेतही भावविश्वात झाले असतील; एवढेच नव्हे, तर स्वकीय नव्या संकेतांप्रमाणेच ह्या परकीय नव्या संकेतानीही नवे अर्थ व नव्या जाणीवा यांची वेगळी आणि वैशिष्ट्यपूर्ण भर तत्कालीन भावविश्वात घातली असेल. या नव्या भरीने भावविश्वाची क्षितिजे विस्तारून नवे परकीय संकेत स्वकीय संकेताइतकेच आत्मसात केले गेले असतील. एवढेच नव्हे तर पर्यायाने त्यांच्याबद्दल आत्मीयता वाटून त्यांचा वापर व्यवहारात अथवा आविष्कारात स्वकीय संकेताइतकाच निःसंकोचपणे व स्वाभाविकपणे होत असेल.

अशा रीतीने शिवकालीन भावविश्वात मुरलेल्या त्या विश्वाशी सर्वार्थाने एकजीव झालेल्या नव्या स्वकीय व परकीय संकेतांच्या नानाविध सामुग्रीतूनच शिवकालीन सारे जीवन नव्याने साकारले. प्रदीर्घ यवनी सत्तेच्या प्रभावी साहचर्याने भावविश्वात रुजलेले अनेक फारसी संकेत शक्तीसौष्ठव शैलीने समर्थपणे राबवून, आविष्काराचे नवे मानदंड निर्माण करण्यात आले. वास्तुशिल्पाची स्वतःची महाराष्ट्रीय महान परंपरा मागे उभी असूनही शिवकाळातील रायगडावरचे सारे वास्तुमात्र बांधणीने यवनी घाटाचे असले तरी तेच, मोठ्या आत्मीयतेने, अभिमानाने व आत्मविश्वासाने स्वतःचे म्हणून बांधले गेले, ते वास्तुशास्त्राच्या परकीय परंतु त्यावेळी प्रचलीत असलेल्या यवनी संकेतांनाच राबवून, त्यांना वेगळे रूप देऊन. रायगडावरचे जगदीश्वराचे मंदिरसुद्धा थाटघाटात यवनी दर्ग्याच्या घराण्याचे दिसते ते मंदिराला दर्ग्याचा घाट देण्यास, मंदिर बांधणारांना त्याकाळी कोणताही संकोच वाटला नाही म्हणून. उलट 'जगदीश्वराचा हा प्रासाद जगाला आनंद देणारा (आहे)' असे त्याचे त्याच काळात कोरलेल्या शिलालेखात वर्णन करण्यात आले आहे. साडेतीनश वर्षाच्या यवनी राजवटीमुळे महाराष्ट्रातील इतर प्राचीन परंपरांप्रमाणेच प्राचीन वस्तुपरंपराही शिवकाळात लोप पावली होती. त्या परंपरेतील सारे संकेत निःसत्व निर्जीव झाले होते. कोरीव कारागिरीच्या जडावाने अंतर्बाह्य मढविलेले पारंपरिक प्राचीन वास्तुशिल्प शिवकालीन जीवनातील नव्या जाणीवा–निष्ठांच्या दृष्टीने निरर्थक व निरुपयोगी होते. उपासनेच्या व उपयुक्ततेच्या दृष्टीनेही. त्या वास्तुशिल्पाची जड घडण त्याचा थाटघाट किंबहुना त्याच्या मागचे सारे भावविश्वच वेगळे होते. शिवकालीन भावविश्वाहून सर्वस्वी भिन्न–सर्वस्वी विरुद्ध प्रकृतीचे. त्याऐवजी साडेतीनशे वर्षाच्या अव्याहत साहचर्याने रूढ झालेली शिवकाळातील 'घुमट मशीदी मनोहर' यांची प्रचलित वास्तुपरंपरा स्वतःच्या घरामंदिरांकरिता राबविणेच इष्ट होते; आणि शिवकालीन प्रेरणेने हेच केले. त्यावेळच्या प्रचलित यवनी वास्तुशास्त्राचा आधार घेऊन शिवकाळाने अनेक वाडे–हुडे बांधले; अंबरखाने महाद्वारे, मंदिरे उभी केली; ती सारी यवनी इमारतींची केवळ नक्कल म्हणून नव्हे, तर प्रचलित परकीय संकेतांना आत्मविश्वासाने राबवून. शिवकालीन भावविश्वातील शक्तीसौष्ठव शैलीने निर्माण केलेली सर्वस्वी नवी निर्मिती म्हणून. या निर्मीतीतही जागरूकता स्पष्ट दिसून येते. स्वतःच्या भावविश्वात न वसणारे स्वकीय प्राचीन जीर्ण संकेत जसे शिवकाळात कटाक्षाने टाळण्यात आले तसे स्वतःच्या भावविश्वात त्याकाळी न मानवणारे परकीय यवनी संकेतही तेवढ्याच कटाक्षाने दूर ठेवण्यात आले. ताजमहाल आणि रायगड (शिवकालीन) काही दशकांच्याच फरकाने बांधले गेले....परंतु किती तफावतीने ! !

शक्तीसौष्ठवाच्या शिवकालीन शैलीचे 'स्वतंत्र' सृजन सामर्थ्य नेमके काय होते हे पहावयाचे झाल्यास, वर उल्लेख केलेल्या रायगडावरील जगदीश्वर मंदिराच्या प्रांगणात, आज छिन्नविच्छिन्न अवस्थेत पण तरीही मोठ्या डौलात बसलेल्या नंदीची कोरलेली प्रतिमा अभ्यासणे आवश्यक आहे.

शिवकालात बांधण्यात आलेल्या वास्तूला यवनी वास्तुशास्त्राचा तरी आधार होता; परंतु हे नंदीचे शिल्प मात्र सर्वस्वी स्वतंत्र आहे.कारण या शिल्पाला यवनी शिल्पपरंपरेत आधार मिळणेच शक्य नाही. कारण मूर्तीशिल्पाची यवनी परंपराच नाही. मुसलमान पूर्व भारतीय शिल्पपरंपरा याबाबतीत समृद्ध होती, परंतु शिवकाळापूर्वीच ती सर्वस्वी लोप पावली होती. शिवकाळातही एखाद्या प्राचीन उध्वस्त शिवमंदिरातून नंदी असावेत, परंतु ते सारे बाराव्या तेराव्या शतकातील, अतिरिक्त कारागिरीच्या जडावाचे ओझे वाहणारे, नाना तऱ्हेच्या लहानमोठ्या घंटा, माळा, साखळ्या,








गोंडे आणि नक्षी व जडावाचे पट्टे असलेल्या झुली घालून सभा-मंडपात बसविलेले बैल होते. "वामहस्ति वृषण धरोनि, तर्जनि अंगुष्ठ शृंगी ठेऊनी । पूजा पहाती समलोचनी, इंद्रसमान होय नर ।।"—असा त्यांचा उपासनेत उपयोग होत असल्यामुळे त्यांचे आकारही वेताचे आटोपशीर झाले होते. असा आयता कोरलेला आणि यवनांच्या 'बुतशिकन' तडाख्यातून वाचलेला, एखाद्या प्राचीन उध्वस्त मंदिरातील ठेंगणा, ठुसका, नंदी आणून रायगडावरच्या जगदीश्वराच्या प्रांगणात बसवताही आला असता. परंतु तसा तो बसविण्यात आला नाही कारण शिवकाळातील शक्तीसौष्ठव शैलीने हा सजलेला प्राचीन बैल, नंदी म्हणून पत्करलाच नसता.

आज रायगडावर दिसतो तो नंदी शिवकाळातच कोरला गेला, शिवकालीन शक्तीसौष्ठव शैलीने; कोणत्याही प्राचीन अथवा परकीय परंपरेचा आधार घेतल्याशिवाय. हा नंदी म्हणजे शिवकाळा-तील दुर्मिळ शिल्पकलेचा प्रातिनिधिक नमुना. म्हणूनच त्याचा सूक्ष्म अभ्यास आवश्यक.

नंदीचे मुख व शिंगे आज छिन्नविच्छिन्न आहेत. बाकी अव-शेषांवरून त्याच्या चेहऱ्याचा घाट लक्षात येतो. उंचावलेला मत्त भालप्रदेश, स्पष्ट विशाल डोळे, शिंगे फोडण्यात आली असली तरी त्यांची जागा व त्यांचा उभार कसा असावा याचा अंदाज बांधता येतो. नंदीची खानदान महाराष्ट्रीयच आहे. मुख व शिंगे सोडल्यास बाकी नंदी बहुतांशाने शाबूत आहे व या शाबूत भागावरूनच नंदीच्या शरीरसौष्ठवाची आपल्याला आज कल्पना येते. भरदार मान व भक्कम खांदे, वळकट मागचे पुढचे पाय, पाठीवर खांद्याच्या मध्य-भागी गोलाकार (जवळ जवळ) घाटदार, घट्ट वशिंड. नंदीची बैठक डाव्या अंगाने असल्यामुळे, सारे शरीरच डाव्या अंगाने कललेले. त्याचप्रमाणे पाठीवरचे वशिंडही भाराने, अत्यंत स्वाभाविकपणे पाठीच्या कण्याच्या किंचित डाव्या अंगाने कललेले. शरीराच्या आका-राच्या मानाने पोट लहान व सडसडीत; परंतु पुठ्ठे कमालीचे डेरेदार व तेवढेच डौलदार. मागे सुडसुडीत शेपटी. (शेपटीचा शेवटचा भाग व गोंडा फुटलेला) आणि तिच्या खाली दोन्ही मांडयांमधून मागच्या बाजूने वृषणाचा सुबद्ध घोटीव लोळा बाहेर आलेला.

अंगावर चढवलेला साजही अगदी साधा व नेमका. गळयात साखळी, पुतळयांची माळ. पाठीवर पोटाखालून गेलेला जेरबंदाचा साधा पट्टा. या पट्टयालाच समोरून गळयाखालून व मागून शेपटी-खालून जाणारी गोंडे लावलेली दुमची अडकवलेली.

नंदी पहाताक्षणीच प्रथम डोळयात भरतो तो नंदीचा पुष्ट सशक्त बांधा व जाणवतो तो त्याच्या बैठकीतला जिवंत सहजपणा. खरं म्हणजे तो बसला आहे असे वाटतच नाही; तर तो नुकताच येऊन टेकला आहे, क्षणार्धात पुन्हा (सेवेचे ठायी) उठून उभे रहा-ण्याच्या तत्परतेने. त्यामुळे बसलेल्या स्थितीतही तो सावध व गतिमान वाटतो. (तत्परता ही गतिमानतेचाच एक सहभाव. शिवकाळात तो व्यवहारातल्या अनेक बारीक तपशीलांतूनही सूचित होतो. रायगडचा स्थपती जगदीश्वर मंदीराच्या पायरीवर आपले नाव कोरतो 'सेवेचे ठायी तत्पर हिराजी इटळकर'. शिवाजी राजांचे पंतप्रधान मोरोपंत पेशवे आपल्या मुद्रेत लिहितात, "श्री शिवचरणी तत्पर, त्र्यंबकसुत मोरेश्वर".) या नंदीची सारी आकृती कमा-लीची नेटकी आहे. आणि हे नेटकेपण आकृतीतून प्रतीत होणाऱ्या शक्तीमुळे आले आहे. मुखाचे, पायांचे पुठ्ठयांचे, शेपटीचे व वृषणाचे रेखन स्वाभाविक तर आहेच, परंतु विशेषत्वाने शक्तीसौष्ठवाच्या घाटाचे आहे. शरीराच्या पुष्ट डौलदार बांध्यामधून, निरनिराळया अवयवांच्या आट-घाटातून, स्नायु-सांध्यांच्या लपेटी मरडीतून आपल्याला जाणवते ती शक्ती आणि चैतन्य. कोणत्याही कोनातून पाहिले तरी, नंदीची आकृती सुडौल तर आहेच; परंतु आकृतीचा सारा डौल, आकृतीतील वेगवेगळे आकार-अवकाश शक्तीनिष्ठ दाट-दाबांनी भारले गेल्यामुळे निर्माण झाला आहे हेही जाणवते. शिवकाळातील शक्तीसौष्ठव शैलीची सारी वैशिष्टये या नंदीच्या आकृतीत स्पष्टपणे आढळतात.

शक्ती आणि चैतन्य हे सौष्ठवाचे प्रमुख गुण ठरल्यानंतर या गुणांच्या आनुषंगाने येणारे इतरही काही विशिष्ट गुण शक्ती-सौष्ठव शैलीने निर्माण झालेल्या आविष्कारात आढळावेत हे अपरि-हार्यच नव्हे तर सुसंगतही आहे. या गुणात प्रामुख्याने दिसून येणारा गुण म्हणजे गतिमानता. खरं म्हणजे शक्ती हे तत्वच गतिमान आहे. या न्यायाने शक्तीसौष्ठव शैलीतील शक्ती हीच स्वतः गतिमान असते. शक्तीसौष्ठव शैलीतील साऱ्या आविष्कारात ही गतिमानता वेगवेगळया संदर्भात जाणवते; दृक अथवा भावसंवेद्य प्रतिमांनी, आकार अवकाश व वजने व्याप यांच्या वेगवेगळया शक्तीभारात ती प्रत्यही सुचविली जाते.

शिवाजी राजांच्या पत्रातील आक्रमणाची प्रतिमा तर प्रत्यक्ष गतिमान आहेच; परंतु संरक्षणाची मनोगम्य प्रतिमाही, प्रतिकारात, तेवढीच किंबहुना त्याहीपेक्षा अधिक गतिमान आहे. "समन्दे तलाश"च्या प्रतिमेने आक्रमणाची गतिमानता सूचित होते, समन्दे तलाशला अगतिक करणाऱ्या प्रदेशाची निग्रही गतिमानताही वेगळया स्वरूपात सूचित होते. अखेर आक्रमकाला आपली ढाल खाली ठेवावयास भाग पाडणाऱ्या रूपकात तर ती प्रत्यक्षच जाणवते. आकाशाला भिडणारे प्रचंड पहाड, थांग न लागणाऱ्या खोल दऱ्या, दुर्लंघ्य ओढाळ नाले आणि शेवटी रक्ताच्या अफाट अस्वस्थ दर्याचे चित्र; या साऱ्यातून वेगवेगळया सूचनांनी गतिमानताच सूचित होते.

शिवाजी राजांच्या पत्रातूनच नव्हे तर शिवकाळातल्या साऱ्याच आविष्कारांतून ही गतिमानता प्रत्ययास येते. तुकाराम, रामदास, वामन पंडित यांच्या विदग्ध लिखाणांतून ती सूचित होते; त्याच-प्रमाणे सूचनेचा 'वाङमयीन शिष्टाचार' न पाळणाऱ्या फटकळ पोवाडयात ती वेगळया तऱ्हेने जाणवते.

# स्वप्न समाजवादाचे, साकारतो महाराष्ट्र साचे

स्वातंत्र्य लाभलं. राष्ट्रीय ध्येये ठरली. लोकशाही समाजवादाची स्थापना हे त्यापैकी मुख्य, कसेल त्याची भूमी, अधिक उत्पादन व सामाजिक सेवांचा विस्तार हे लोकशाही समाजवादी जीवनाचे मुख्य आधार. महाराष्ट्राने या सर्व क्षेत्रात उत्साहजनक कार्य केलेले आहे.

कुळकायद्याखाली १० लाख ३६ हजार चारशे हेक्टर जमिनीची मालकी ८ लाख ७५ हजार तीनशे कुळांना दिली.

कमाल जमीन धारणा कायद्याखाली २१ हजार ९ शे हेक्टर जमीन ५९०० व्यक्तींना व ७० सोसायटयांना प्रत्यक्ष कसण्यासाठी दिली.

भूमिहीनांना ३ लाख ७८ हजार सरकारी जमीन वाटली, पैकी ७२ टक्के जमीन मागासलेल्या वर्गातील व्यक्तींना मिळाली.

तुकडे बंदी कायद्याखाली ६६९५ खेड्यातून ५३ लाख ६४ हजार हेक्टर जमिनीचे एकत्रीकरण केले.

२० हजार ३ शे भूमिहीन शेतमजुरांच्या कुटुंबाना, पडित जमिनीत स्थायी होण्यासाठी, ३ कोटी ३ लाख ८५ हजार रुपये मदत दिली. तसेच त्यांच्या १७ आदर्श वसाहतीसाठी ३५ लाख ७७ हजार रूपये खर्च केले.

अन्नधान्याचे बाबतीत हे राज्य स्वयंपूर्ण व्हावे म्हणून केलेल्या प्रयत्नामुळे या राज्याची अन्नधान्य उत्पादन क्षमता ५५ लाख टनावरून ७२ लाख टनापर्यंत वाढली.

आजमितीला राज्यांत सर्व प्रकारच्या ४१,३६२ सहकारी संस्था असून त्यांची सदस्य संख्या ८९ लक्ष आहे. त्यांचे हिस्से भांडवल १९६ कोटी रूपये आहे व स्वतःचा निधी २८९ कोटी रूपये आहे. खेळते भांडवल १२५७ कोटी रूपये व कर्जाऊ दिलेली रक्कम २८५ कोटी रुपये आहे.

आर्थिक मागासलेपणाचा निकष लावून ज्या पालकांचे वार्षिक उत्पन्न २४०० रूपयापेक्षा कमी आहे, अशा पालकांच्या पाल्यांना एस्. एस्. सी. पर्यंत शिक्षण मुफ्त केले. १२०० रूपयेपर्यंत उत्पन्न असलेल्या पालकांच्या पाल्यांना तर सर्व स्तरापर्यंत शिक्षण मुफ्त मिळते. याचा परिणाम म्हणून राज्यात शिक्षणाचा प्रसार प्रचंड वेगाने झाला आहे. व शैक्षणिक संस्था व त्यात शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या अशी आहे : प्राथमिक–४४,२२३ व ६५.१० लाख, माध्यमिक–४८१६ व १९.४३ लाख आणि विद्यालयीन ४४८ व ३ लाख ४००

१९६९–७० साली मागास वर्गातील २५,३९२ विद्यार्थ्यांना १ कोटी ६५ लक्ष रूपये शिष्यवृत्ती देण्यात आली.

महाराष्ट्र व विदर्भ हाऊसिंग बोर्डाने बांधलेल्या गाळ्यांत २० टक्के जागा मागासलेल्या वर्गाकरिता राखून ठेवण्यात आल्या आहेत.

राज्यांतील १२,००० पेक्षा जास्त खेड्यांना वीज मिळाली असून १,९५,००० कृषी पंप विजेवर चालत आहेत.

ग्रामीण भागांत पिण्याचे पाण्याची सोय व्हावी म्हणून २१,५०० विहिरींचे काम पूर्ण करण्यात आले आहे.

ग्रामीण व शहरी भागातील ६४,२१२ कि. मी. लांबीच्या सडकांमुळे दळणवळण सुकर झाले आहे.

मंगल मराठी भूमीत – घुमते समाजवादाचे गीत








"कृष्णा घोडीला चाबूक केला । आला मढ्याच्या घाटाला
घाट मढ्याचा उतरला । आला विरवाडी गावाला
गाव विरवाडी सोडला । आला पोलातपुराला
पोलातपूर सोडले । घाट पाराचा वेंघला—"

**—सिंहगडाचा पोवाडा**

जिजाबाईचा तातडीचा निरोप आल्यानंतर शिवाजीराजे तडक प्रतापगडाकडे निघाले ही घटना. आज वाचले तर हे केवळ गतीचे वर्णन वाटेल, पण शिवकाळातील भावविश्वाचा भूगोल ज्यांना माहीत आहे त्यांनाच या वर्णनातील गतिमानता जाणवेल.

चित्‌शक्ती व गतिमानता या गुणांच्या प्रभावामुळे धीटपणा, स्पष्टपणा, नेमकेपणा आदि इतर गुणही आविष्काराच्या आकृतीबंधात ओघानेच प्रकट होतात; व शक्तीसौष्ठव शैलीचे वैशिष्ट्यच सूचक ठरतात. वस्तुतः स्पष्टपणा, धीटपणा, नेमकेपणा हे शक्ती व गतिमानता या गुणांचेच सहभाव. शक्तीसौष्ठव शैलीत या गुणांचा प्रभाव जाणवणे अपरिहार्यच नव्हे तर तर्कनिष्ठ आहे. शिवकालीन साऱ्या आकृतिबंधात हे सहभाव स्पष्ट प्रतीत होतात. शिवकालातील वास्तुशिल्प हे याचे प्रत्ययकारी उदाहरण. शिवाजी राजांचे फारसीपत्र धीट, स्पष्ट व नेमके कसे आहे हे आपण पाहिलेच. शिवकालीन इतर वाङमयीन आविष्कारांतूनही याच गुणांची जाणीव वेगवेगळ्या संदर्भात होते.

"दुष्ट संहारिले मागे ऐसे, उदंड ऐकतो
परंतु रोकडे कांहीं मूळ सामर्थ्य दाखवी"—रामदास

अथवा—

"तुका म्हणे तुम्हां साजे हे श्रीहरी
आम्ही निलाजरी नहों ऐसी ॥—तुकाराम

अथवा—

"जगीं मिरवोनिया सिद्धी। आपल्या टीकांची केली प्रसिद्धी ।
तथापि नाही झाली अर्थसिद्धी । यथार्थ गीता रहस्याची ॥"

—वामन पंडित




"...आयला रोज बिलक्षन व्हायला पायजे. हान शिक्का की घे धा रुपय...हान शिक्का की घे धा रुपय...हान शिक्का की...

आविष्कारांतील धीटपणा व स्पष्टपणाच्या लेखी प्रसंगी देवांना व संतांना, म्हणजे तत्कालीन भावविश्वांतील श्रेष्ठ मूल्यांनाही असे परखड बोल ऐकून घ्यावे लागत.

निग्रही—स्वसंरक्षण हीच शिवकालीन भावविश्वातील मूलभूत जाणीव दिसते. या जाणीवेचा प्रभाव शिवकाळात निर्माण झालेल्या साऱ्या आविष्कारांवर होऊन ते सारे आविष्कार, आपआपल्या परीने, निग्रही प्रतिकाराच्या सावध पवित्र्यात कायम उभे असलेले दिसतात. मग ते आविष्कार शिल्पातले असोत, वास्तुशिल्पातले असोत अथवा शिष्ट किंवा लोकसाहित्यातील असोत.

नेमकेपणा, अविस्तार, हेसुद्धा गतिमानतेबरोबरच येणारे अधिक गुण. विस्तार किंवा पाल्हाळ हे स्वभावतःच गतिमानतेच्या विरुद्ध. आकृतीबंधातील सारे शक्तभार, शक्तीच्या परिमाणाने मोजल्या जात असल्यामुळे, विस्तार, पाल्हाळ करणाऱ्या निःशक्त व निरर्थक आकार अवकाशांना येथे स्थानच नाही; मग आकृतीबंधाचा व्यापविस्तार केवढाही असो. या गुणांबरोबरच शिस्त, संयम, निष्ठा, दैन्याचा अभाव, निर्भयत्व, भावविवशतेचा अभाव, आदि आणखीही गुणांचा शक्तीसौष्ठव शैलीचे वैशिष्ट्य म्हणून उल्लेख करता येईल.

शक्तीसौष्ठव शैलीचे सूत्र व या सूत्रान्वये निर्माण होणाऱ्या आकृतीबंधाचा येथपर्यंत विचार केला. त्याचबरोबर शिवकालीन आविष्कारांतील आकृतीबंध हा विशेषतः शक्तीसौष्ठव शैलीने निर्माण करण्यात आलेला आकृतीबंधच कसा आहे हेही पाहिले. शक्तीसौष्ठव तत्त्वाने या आकृतीबंधाला दिलेले 'अंग' हाच त्याचा आकार. ह्यावर संस्कार झाले ते शक्तीसौष्ठवाचे. शक्तीसौष्ठवाला योग्य वाटतील ते व तेवढेच बदल या अंगाच्या आकारात व्हावयाचे. एरव्ही केवळ आकार सौष्ठवाकरिता हे अंग वाकणे अथवा वळणे अशक्य. सारांश शक्तीसौष्ठव शैलीतील सौष्ठव विचार मुख्यत्वेकरून आकृतीबंधाच्या शक्तीशाली अंगाविषयीच करण्यात आलेला असतो. कोणतीही आकृती शक्तीने किती नेटकी आहे हेच बघण्यात येते. समतोल-संवाद सौष्ठव शैलीप्रमाणे तो 'आकार रचनेला' प्राधान्य देऊन करण्यात आलेला नसतो.

शिवकालीन आविष्कार शक्तीसौष्ठव शैलीतच साकारले जाणे शक्य होते, कारण शिवकालीन भावविश्वात, शक्तीसौष्ठव शैलीच आविष्काराचे तंत्र म्हणून सिद्ध झाली होती अथवा होऊ शकत होती. समतोल-संवाद सौष्ठव तंत्र सिद्ध होण्यास आवश्यक असलेले भावविश्व त्यावेळी सिद्ध झाले नव्हते—सिद्ध होऊ शकत नव्हते म्हणून शक्तीसौष्ठव शैलीचे मुख्य तत्त्व जी चित्‌शक्ती, ही शिवकालीन भावविश्वात कशी निर्माण झाली?—एवढेच नव्हे तर शिवकालीन भावविश्वात या चित्‌शक्तीलाच एवढे का महत्त्व मिळाले?—पर्यायाने शक्तीसौष्ठव हाच आविष्काराचा प्रमुख घटक ठरून, सौंदर्याचाही तोच मानदंड—त्याकाळी—का ठरला?—इ. इ. प्रश्नांचा विचार पुढील लेखात.

**(क्रमशः)**






## याला म्हणतात पारख

प्रसिद्ध संशोधक आइन्स्टिन यांना फावल्या वेळात चित्रे काढण्याचा नाद होता. एकदा मोठी चित्रस्पर्धा जाहीर करण्यात आली. आइन्स्टिनच्या काही भक्तांनी त्यांनी काढलेले एक चित्र त्यांना न सांगता पळवून नेले आणि स्पर्धेसाठी पाठवून दिले. आइन्स्टिनना पहिले बक्षिस मिळाले व असे जाहीर करण्यात आले की, नवचित्राच्या प्रकारामध्ये ते चित्र फार सुंदर आहे.

तो निकाल ऐकून आइन्स्टिनना आश्चर्याचा धक्का बसला. जेथे बक्षिस मिळालेली चित्रे टांगून ठेवली होती; तेथे आइन्स्टिन गेले व त्यांना कळून आले की त्यांनी जे आपल्या वडिलांचे चित्र काढले होते ते उलटे ठेवले होते व त्याच उलटया चित्रास पहिले बक्षिस जाहीर करण्यात आले होते !

## श्रेष्ठ मैत्री

ॲरिस्टॉटलने मैत्रीचे तीन प्रकार सांगितले आहे--

१) Friendship for profit (लाभासाठी मैत्री)

२) Friendship for pleasure (सुखासाठी मैत्री)

३) Friendship for principle (तत्त्वासाठी मैत्री)

तीन मैत्रीत तिसरी मैत्री श्रेष्ठ आहे.

## त्वरित सल्ला पाठवा

एका रेल्वे स्टेशन मास्तरला अशी तंबी देण्यात आली की- 'मुख्य कचेरीचा पूर्व सल्ला घेतल्याशिवाय आपण नेहमी गोष्टी करता, तेव्हां ह्यापुढे मुख्य कचेरीचा सल्ला घेऊन मग काय ते करावे.' हा सल्ला ह्या स्टेशनमास्तरने एकदा इतका तंतोतंत पाळला की त्याने जनरल मॅनेजरला पुढील तार केली --

"एका वॅगनमधला वाघ मोकाट सुटला असून तो गार्डला प्लॅटफॉर्मवर खातोय. त्वरीत सल्ला द्यावा."

## वडिलांचं वेगळं मत

सिडने स्मिथ हा सुप्रसिद्ध पाद्री विद्वान तर होताच पण आपल्या तरल विनोद बुद्धीबद्दलही त्याची ख्याती होती. एकदा एका वकीलाबरोबर त्याचा वितंडवाद चालू होता. आपल्या कौशल्यपूर्ण विवेचनाने स्मिथ वकिलसाहेबांना बेजार केले. वादविवादात आपला पराभव होतो आहे हे पाहून वकिलसाहेब चिडून म्हणाले-" मला जर मुलगा असता आणि तो जर मूर्ख असता तर मी त्याला नक्की पाद्री केले असते." हे ऐकून स्मिथ शांतपणे उत्तरला, " तुमच्या तीर्थरुपांचे मत मात्र तुमच्यापेक्षा वेगळं दिसतंय् !"

## उत्तम हत्ती व त्याची निगा

उत्तम हत्तीची लक्षणे पुढीलप्रमाणे :- सात अरत्नी उंच, नऊ अरत्नी लांब व दहा अरत्नी ज्याच्या अंगाचा घेर आहे असा चाळीस वर्षे वयाचा हत्ती हा उत्तम हत्ती होय.

प्रत्येक अरत्नी उंचीला पुढीलप्रमाणे हत्तीच्या खाद्य पदार्थांत वाढ करावी. एक द्रोण तांदूळ, अर्धा आढक तेल, तीन प्रस्थ




उत्तम लोणी, दहा पल मीठ, पन्नास पल मांस, द्रवासाठी एक आढक रस, अथवा दोन आढक दही, एक आढक दहा पळे ज्याच्यामध्ये साखर टाकली आहे असे मद्य किंवा दोन आढके दूध (शक्तीवर्धक पेय म्हणून), खांद्याना लावायला एक प्रस्थ तेल, डोक्याला लावायला एकअष्टमांश प्रस्थ तेल, सव्वादोन भार हिरवे गवत, अडीच भार वाळलेले गवत व त्याला हवा असेल तितका झाडांचा पाला. माज येण्याच्या अवस्थेपलिकडे गेलेल्या अशा आठ अरत्नी उंच हत्तीला सात अरत्नी उंच हत्ती इतकाच आहार द्यावा. सहा अरत्नी अथवा पाच अरत्नी हत्तींना त्यांच्या त्यांच्या प्रमाणात आहार द्यावा.

## अगदी सोपा उपाय

नाशिकला पोलिस भरती चालू होती. एका उमेदवाराला असा प्रश्न विचारण्यात आला- "समज तू पोलिस असलेली जीप चालवतो आहेस व तुझ्या जीपचा दरोडेखोरांनीही एका जीपमधून ताशी चाळीस मैल वेगाने पाठलाग केला तर अशावेळी तू काय करशील ?"

" माझी जीप तशी पन्नास मैल वेगाने चालवीन !"

## स्वामीभक्त गजराज

ॲलेक्झांडर व पोरस यांच्या झालेल्या युद्धात राजा पोरसच्या हत्तीच्या कामगिरीचे प्लूटार्कने जे वर्णन केले आहे त्यावरून रणहत्तीच्या रणकौशल्याची कल्पना येऊ शकेल. प्लूटार्क म्हणतो-

" जरी जखमी झाला नव्हता तरी राजा पोरसचा हत्ती खवळून शत्रूंवर चाल करीत होता. तो वारंवार शत्रूची फळी त्यांना बदलावयास भाग पाडीत होता. राजाची स्थिती ओळखून माहुताने हत्तीला मंडलाकृती फिरवून माघार घ्यावयास लावीपर्यंत त्याचा हा क्रम चालू होता. माहुताला असे वाटले की राजाला खाली उतरावयाचे आहे. म्हणून त्याने नेहमीच्या पद्धतीने हत्तीला गुडघ्यावर बसावयास लाविले. ॲलेक्झांडरला तो मेला असे वाटले व त्याने त्याचे शरीर आधीन करून घेण्यास्तव आपल्या सैनिकांना आज्ञा केली. पण तेवढ्यात हत्ती एकदम आपल्या धन्यावरील हल्ल्यापासून त्याचे संरक्षण करण्यासाठी मागे वळला व त्याने आपल्या स्वामीचे शरीर एकदम उचलून पाठीवर घेतले."

— दि. श्री. कराडकर










# राजकीय खेळातील निर्जीव प्यादी बनू नका !

"येणार" "येणार नाही" "बाई फार इन्कार करते आहे त्या अर्थी निश्चित येणार !" आदि चर्चा हवेत विरली आहे आणि निवडणुकांचे ढोल डिंडिम पिटले जाऊ लागले आहेत. भिंती रंगविल्या जाऊ लागल्या आहेत. काही ठिकाणी एकमेकांची तोंडेही रंगविली जात आहेत. खून, मारपीट आदि प्रकार सध्याच्या राजकीय धुमाळीत अशक्य आहेत असे म्हणणे वा मानणे भावडेपणाचेच ठरेल. 'तात्विक अधिष्ठान' दिल्याशिवाय कुठलाही सभ्य व सुसंस्कृत मानल्या गेलेल्या राष्ट्रातील व्यवहार पार पडू शकत नाही. कुत्र्याला गोळ्या घालून मारतानाही त्याला वेडा ठरवावे लागते म्हणजे मग ती हत्या 'तात्त्विक' व 'धर्म्य' ठरते. तसेच लोकशाहीतल्या प्रत्येक कृत्याला काही "तात्विक अधिष्ठान" द्यावेच लागते. राज्यकर्ता पक्ष वा नेते यांच्या 'लहरीं'नाही तात्विक अधिष्ठान दिल्याशिवाय त्या 'धर्म्य' वा 'स्वीकार्य' ठरू शकत नाहीत. आणि म्हणूनच "लोकसभेच्या" ह्या निवडणुका कशा अपरिहार्य होत्या हे सांगण्याचा खटाटोप राज्यकर्ते व त्यांचे प्रवक्ते करीत आहेत. "जनतेचा कौल" मागण्याचाही दावा केला जात आहे. "समाजवादी" कार्यक्रमांनाच गेली तेवीस वर्षे जनता सतत कौल देत आलेली आहे. त्या कार्यक्रमांच्या कार्यवाहीत जनता आजवर आडवी आलेली नाही ही गोष्ट ह्या संदर्भात सोयिस्करपणे विसरली जात असून नव्या कौलासाठी लक्षावधि रुपयांचा बोजा शासन व जनता यांना स्वीकारावा लागणार आहे. 'समाजवाद' ही घोषणा मूठभर तथाकथित उजव्या वा प्रतिगामी स्थितिवाद्यांना रुचली-पचली नसली तरी ती सतत केली गेली, त्यासाठी पंचवार्षिक योजनांचे प्रचंड प्रपंच करण्यात अले, प्रकल्पांच्या घोषणाही केल्या गेल्या, 'दारिद्रच हटावो'च्याही गर्जना हवेत घुमल्या. १९६७ च्या निवडणुकांपर्यंत केंद्रात व राज्यातून अनिर्बंध सत्ता ह्या तथाकथित 'क्रांतिकारक' व 'समाजवादी' मंडळींच्या हाती देण्यात आलेली होती. संपूर्ण विश्वासाचा 'कौल' दिला गेलेला होता. आजवर सतत तिने समाजवादाला अनुकूल कौलच दिला असताना व आजही ती कुठल्याही संघटित स्वरुपात विरोधाला उभी ठाकलेली नसताना, उलट बँक राष्ट्रीयीकरणाचे वेळी तिने पंतप्रधानांचे घरी जे 'हर्ष-मोर्चे' नेले त्याची सतत ग्वाही दिली गेलेली असताना संस्थानिकांच्या तनख्याबाबत लोकसभा, जनता अनुकूल असताना, गेल्या दीड वर्षाच्या राजकारणातील प्रत्येक पावलाला तिने प्रतिकूल प्रतिक्रिया व्यक्त केलेली नसताना हा कौल आत्ताच मागण्याची खरोखरच गरज होती काय असा प्रश्न पडतो. आज अशी कोणती खास परिस्थिति उत्पन्न झाली होती की, जिची अपरिहार्यता ध्यानी घेऊन पंतप्रधानांना हा निर्णय घेणे भाग पडले. "जनता कौल" हे एक फसवे थोतांड असून, ह्या देशातल्या जनतेला राजकीय पक्षांच्या सोयीसाठी, फायद्यासाठी चाललेल्या खेळातली निर्जीव प्यादी समजण्यात येत आहेसे दुर्दैवाने दिसते. मतांचा कौल मागण्यासाठी जनतेच्या श्रेष्ठत्वाचा ढोल–डिंडिम पिटणे नेहमीच साऱ्या पक्षांना आवश्यक वाटत आलेले आहे. परंतु कोटयवधींच्या ह्या देशात आजतरी दुर्दैवाने 'डोळस' कौल, 'तत्वनिष्ठ' कौल, मूल्यांसाठी 'मोल' न मागणारा कौल, व्यक्ति, पक्ष, जात, उपजात, प्रांत, भाषाविषयक निष्ठा यापेक्षा अंतिम व श्रेष्ठतर राष्ट्र आहे असे मानणारा कौल. जनता देऊ शकेलसे वातावरण नाही. सुविद्य, सुशिक्षित व सुजाण मतदार हा कौल देऊ शकतात. केवळ वय हीच कसोटी मानणारा व मागणारा व खेड्यापाड्यातून पसरलेला जनसमाज हा 'समाजवादा'ला कौल देतच असलेला दिसतो मग पुन्हा ह्या कौलाची गरज ? पंडितजींसारखे लोकोत्तर व जगत्मान्य नेतृत्व लाभले असतानाही व त्यांच्या नेतृत्वावर जनतेन नितांत प्रेम केले असतानाही ही तथाकथित 'कळवळावादी' मंडळी जनतेच्या समस्या सोडवू शकली नाहीत. उलट 'श्रीमंत अधिक श्रीमंत झाले व गरीब अधिक गरीब झाले' ही कबुली खुद्द पंडितजींनाच द्यावी लागली. आज असे भासविण्यात येत आहे की, मोरारजी, कामराज, रेड्डी, निजलिंगप्पा, चंद्रभानु गुप्ता वा रामसुभगसिंग ही मंडळी पंडितजींचे पाय ओढीत असत. ही सिंडिकेट प्रगतीचा अडसर होती आणि म्हणून हे जनकल्याणार्थ धर्मयुद्ध सुरू झाले असून, ही नवी तुतारी अंतिम विजयदिनासाठी पुकारली जात आहे. आणि याचा नव्याने साक्षात्कार झाल्यासारखी काही माणसे 'वाटगा अधिक कडवा असतो ना' त्या पद्धतीने ह्या कौलाचीही भलावण करीत आहेत.

वास्तविक लोकसभेच्या निवडणुका आताच का या प्रश्नाचे तर्कगत, अपरिहार्य वाटावे असे उत्तर कुणीही देऊ शकला आहे असे दिसत नाही. गेल्या दीड वर्षातल्या अनेक झंझावाती घोषणा व घटना यांचे बाबत 'जनता कौल' फार प्रखर विरोधी होता अशी वस्तुस्थिति नाही. उलट पंतप्रधान इंदिराजींची प्रतिमा स्पष्टच बोलायचे झाले तर (इथे पंडितजींबद्दल, त्यांच्या अष्टपैलू व्यक्तित्वाबद्दल अनादर

सा र स्व त



अनुक्रमणिका

व्यक्त करण्याची भावना नाही. तुलनाही अभिप्रेत नाही. फक्त पटणारे सत्य कथन एवढेच ) इंदिराजींची प्रतिमा पंडितजी वा शास्त्रीजी यांच्यापेक्षाही पुरोगामी, झंझावाती व क्रांतिकारी ठरली आहे. पंडितजींमध्ये एक 'हॅम्लेट' दडून बसला होता. ते फार विचारी होते आणि अतिविचारी माणसे निर्णय घेण्याबाबत 'डॅशी' असत नाहीत. शास्त्रीजी 'डॅशी' होते. त्या वृत्तीनेच असेल कदाचित– त्यांना ताश्कंदला चमत्कारिक व संशयास्पद परिस्थितीत मृत्यु आला. आज इंदिराजींनी ह्या दोघांमधील चांगले गुण घेऊन व दोष टाळून सावधतेने राजकारण केले आहे. त्यांनी आपली प्रतिमा उजळून टाकली आहे. असे असूनही त्या पुन्हा निवडणुकांचा जुगार खेळण्यास का तयार झाल्या आहेत ? वस्तुतः त्या अति सावध आहेत आणि तरीही हे आव्हान त्यांनी स्वीकारले आहे. मतांची मोठी संख्या पाठीशी असूनही हा जुगार कशासाठी ?

आज बहुमत असले तरी सर्वंकष सत्ता नाही. परावलंबन आहे. आणि कुणाहीवर वा कशाहीसाठी अवलंबन आले की, मर्यादित का होईना स्वातंत्र्यहानी होतेच. आजच्या राजकारणात 'सत्ता' हा परवलीचा व अखेरचा शब्द मानला जातो. आणि सत्ता आणि स्तुतीचा मोह कुणाला टळलाय् ? अशा परिस्थितीत सर्वंकष सत्तेसाठी ही अंतिम लढाई चालू झालेली आहे. यात कुठलेही तसे तात्विक वा तार्किक अधिष्ठान नाही. 'तिकिटे' देतानाही 'इंदिरानिष्ठा' ही कसोटी मागितली जाते आहे व त्यासाठी इंडिकेटमध्येच इंदिरा निष्ठेचे 'तपमान' पाहून मग नावे घेतली जात आहेत. इथे अधिक कडवा समाजवादी कोण ? त्यागी कोण ? लायक कोण ? दे. भ. कोण ? चारित्र्यवान कोण आणि राष्ट्रहितदक्ष कोण ह्या कसोट्यांऐवजी जेव्हा इंदिरानिष्ठेच्या 'तर–तमा'ची चर्चा अधिक केली जाते तेव्हा ह्या निवडणुकीमागे काही तात्विक अधिष्ठान, मूल्यांचा संघर्ष वगैरे वगैरे काही नसून, आता 'इंडिकेट कांग्रेस' ( व पर्यायाने केंद्रशासन ) कोणाच्या हाती हेच पाहण्यासाठी हा सारा खटाटोप ! ह्या सर्व खटाटोपात कुठे काही असामान्य तात्विकता दिसत नाही ! तात्विक अधिष्ठानाची अपेक्षा करणेही चूकच म्हणा ! संजीव रेड्डींना एकजात मते देणारी महाराष्ट्र कांग्रेस 'तशीच्या तशी' उठून इंडिकेटमध्ये जाते–एका रात्रीत साऱ्यांचे कंठ पश्चात्तापाने दाटून येतात, आवाज कातर होतो आणि सारी टीम 'की जय' म्हणत 'इंडिकेट-वासी' होते तेव्हा त्यात फार मोठे 'तात्विक' वगैरे कसे मानायचे ?

तेव्हा अखेर सुरू झाले ते सत्तेचे राजकारण !

आजचा 'कौल' हा सुद्धा 'समाजवादा'-साठी नसून 'सत्ता'वादासाठीच मागितला जात आहे. आणि सत्तावाद्यांना सर्वंकष सत्ता हवी म्हणूनच हे धर्मयुद्ध (?) लढले जात आहे ही गोष्ट लपवू म्हटल्याने लपणे कठिण ! ! लोकमताचा कौल मागताना लोकनियुक्त प्रतिनिधींच्या फोन, घर आदि सामान्य सोयीही काढून घेऊन शासनाला मात्र सर्व सोयी उपलब्ध करून देण्यात वा अरण्यात लोकशाहीचे दृष्टीने काही 'फेअर-प्ले' आहे म्हणणे तसे कठिणच.

आणि तरीही आता निवडणुका आल्या आहेत हे सत्य स्वीकारूनच पुढे जायला हवे आहे.

निवडणुकातला सर्वसामान्य जाणकार माणसाचा 'इंटरेस्ट' खरं तर आता संपला आहे. भारतातली लोकशाही १९६७ च्या निवडणुकीनंतर बहुतांशी हास्यास्पद झाली आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरू नये. तिला हास्यास्पद बनविण्यात शासन, शासकीय संयुक्त (व विभक्त) पक्ष, विरोधी पक्ष या साऱ्यांनीच 'हम भी कुछ कम नहीं है' ह्या पद्धतीने हातभार लावलेला आहे. मूल्ये मानणाऱ्या व मूल्यांसाठी जोहर वा बलिदान पत्करणाऱ्या ह्या देशात मूल्यशून्य लोकशाहीचा 'आया-राम-गयारामी'चा हरामी खेळ सुरू झाला तो १९६७ च्या निवडणुकीनंतर ! आणि 'मूल्यां'पेक्षा सौद्यालाच मोल आले. त्यातूनच मग जात, प्रांत, भाषा आदि गोष्टींची 'उपयुक्तता' ध्यानी घेऊन त्यांचे 'बदली मोल' मागण्याची पद्धती रूढ झाली आहे. वरवर जातीयवादाला लाख शिव्या मोजणारी उच्चपदस्थ माणसे वा शासकीय

प्रवक्ते, राजकीय पक्ष वा त्यांचेच प्रवक्ते हे 'जातीय' सौदेच मोठ्या तत्परतेने जमविण्याच्या खटपटीत असताना दिसतात. १९६७ नंतर काही प्रांतातून 'सं. वि. द.'चे प्रयोग झाले व ते हास्यास्पद ठरले. केंद्र शासनाचे डावपेच व 'सं. वि. द.'मधील स्वार्थ व सौदेबाज वृत्ती यातून स्थिर शासन असे त्या त्या प्रांतांना लाभलेच नाही. आणि त्या प्रयोगावरचा जनतेचा विश्वास आज उडालेला आहेसे दिसते. सत्ताबाजांच्या ह्या डावातील निर्जीव प्यादी म्हणजेच जनता ! तिने ही सारी परवड अगतिकतेने पाहिली. उक्तिप्रमाणे कृति वा उक्तीसाठी कृति हे शब्द वासनात राहिले आणि सत्तेसाठी तत्वशून्य व लाचार तडजोडी स्वीकारणेही 'धर्म्य' मानले जाऊ लागले. अन्यथा १९६२ च्या चिनी आक्रमणानंतर प्रतिष्ठा गमावून बसलेल्या डाव्या-उजव्या कम्युनिस्टांना व डांगे-गुप्तांना पंतप्रधानांचे दरबारी एवढी प्रतिष्ठा मिळती ना? 'मुस्लिम लीग'चा काळा व फाळणी निर्माण करणारा इतिहास व त्याचे काळे आलेख ह्या सुवर्णभूमीवर सर्वत्र विखुरलेले असताना 'मुस्लिम लीग'ला स्टेटस व अ. भा. स्थान मिळवून देण्याचे 'पुण्यकर्म' पंतप्रधान व त्यांचे प्रवक्ते यांचे हातून घडते ना ! भारतीय संविधानाची होळी करायला निघालेल्या द्र. मु. क. ला एवढा भाव लाभता ना ! जातीयनिष्ठांना एवढे मोल मिळते ना ! आज एकीकडे फार मोठ्या मूल्यांचा जप व जयघोष चाललेला असताना अन्य ठिकाणी अशा तत्वशून्य व मूल्यशून्य सोयरिकी जोडल्या जात आहेत. आणि सर्वंकष सत्ता, जनतेचा विश्वास, एकसंघ पक्ष संघटना व पंडितजी, पंत, पटेलादि मोठ्या व्यक्तित्वाची माणसे जवळ असताना व स्वातंत्र्य लढ्यातली पुण्याई पाठीशी असताना जो पक्ष तथाकथित समाजवादी परिवर्तन घडवू शकला नाही तोच पक्ष आता संघटना मोडल्यावर व तत्वशून्य तडजोडीचे बळ पाठीशी घेऊन महान समाजपरिवर्तनाला निघाला आहे. त्यासाठीच तुम्हा-आम्हाला पुन्हा एकदा (मतापुरते तरी) मोल आले आहे.

ते कसेही असले तरीही ही निवडणूक भारताच्या भावी इतिहासाचे दृष्टीने फार महत्वाची आहे. भारताची लोकशाही निकोप व सुस्थिर करण्याचे दृष्टीने काही निर्णय ठरणार आहेत. 'लोकशाही'चा हास्यास्पद बनलेला प्रयोग थांबवून तिला पुन्हा प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याचे कार्य करण्याची संधी निवडणुकीने मिळाली आहे. लोकशाहीचे भवितव्य आज सर्वच प्रांतात व केंद्रातही संशयास्पद झाले आहे. ही अवस्था दीर्घकाळ टिकली तर सर्वंकष हुकुमशाहीचा वा लष्करशाहीचा धोका संभवतो. म्हणून प्रत्येक लोकशाहीनिष्ठ माणसाने 'इंटरेस्ट' नसला तरीही 'मतदानाचा हक्क' बजावलाच पाहिजे असे मला वाटते.

मग कुणाला मते द्यायची ? प्रश्न सोपा पण उत्तर काहीसे अवघड !

काँग्रेसच्या फाटाफुटीबाबत पुर्नविचार होऊन हा एकमेव मोठा पक्ष नवी काया घऊन उभा राहील अशी आशा फोल ठरली आहे. म्हणूनच सोयरीक साधण्याचे प्रयत्न दोन्ही पक्षाकडून होत आहेत. ह्या प्रयत्नांबद्दल साक्षेपाने व खात्रीने काही म्हणणे कठिण असले तरीही एक गोष्ट मात्र खरी की, भारताच्या सध्याच्या विशिष्ट परिस्थितीत अशा तऱ्हेचे ध्रुवीकरण काहीसे अपरिहार्य आहे. आज सर्वत्र वेदिली आहे. तत्वशून्यता पसरली आहे. मूल्ये, निष्ठा, तपस्या, त्याग, सेवा व ज्ञानाची उपासना आदि गोष्टी 'विनोद विषय' बनल्या असून, ह्या देशाची एक श्रेष्ठ परंपराच मुळी मुळात खणून काढण्याचे प्रयत्न आतून बाहेरून होत आहेत. अशा वेळी राष्ट्रीय एकात्मता, अस्मिता व लोकशाही मूल्ये यांना मान देणाऱ्यांचे ध्रुवीकरण होणे अगत्याचे आहे असे वाटते. स्वराज्यात आम्ही अधिक गुलाम, परावलंबी व अस्मिताशून्य झालो तर स्वराज्य-साधनेचा हेतु सफल झाला असे कसे म्हणता येईल ? म्हणूनच आमची 'प्रकृति' ध्यानी घेऊन प्रगतीसाठी प्रतिज्ञाबद्ध होणाऱ्यांना आपण कौल दिला पाहिजे. "उडदामाजी काळे गोरे ! काय निवडावे निवडणारे" हे काहीसे खरे असले तरीही लोकशाहीमूल्ये राष्ट्रनिष्ठा, स्वाभिमान व जात-प्रांतादिभेदांच्या अतीत जाऊन व्यापक राष्ट्रभाव ज्यांचे ठायी आहे अशांचा विजय सुचिन्ह ठरेल. 'घोषणाबाजी'चा आता वीट आला असून, शासनाचे सरकारीकरण व स्वातंत्र्य-संकोच ह्या गोष्टींना प्रखर विरोध होण्याची गरज आहे. गेल्या काही वर्षात 'सत्ताबाजी'-मुळे 'जातीयवाद' पुन्हा एकदा 'प्रतिष्ठित' झाला आहे. हा जातीयवाद केवळ मुसलमानांचाच नव्हे तर हिंदूतल्या जातीयवादालाही स्वार्थापोटी भरपूर खतपाणी घातले गेले आहे. त्याला तेजी येणे हा

## आभार

श्री. दीनानाथ दा. दलाल यांच्या आकस्मिक निधनाने त्यांच्याअसंख्य मित्रांना, सुहृदांना, संबंधितांना, हितचिंतकांना दुःखाचा धक्काच बसला. श्री. दलाल यांच्या निधनाबद्दल त्यांनी समक्ष भेटून, पत्रे पाठवून, दूरध्वनीवरून आपल्या भावना व्यक्त केल्या आणि ते आमच्या दुःखात सहभागी झाले. या सर्वांना व्यक्तिशः पत्रे पाठविणे अशक्य असल्याने त्यांचे 'दीपावळी'तूनच आम्ही आभार मानीत आहोत.

—दलाल कुटुंबीय

अनुक्रमणिका





राष्ट्रघात आहे. शेवटी व्यक्ति येतात-जातात. पक्ष येतात-जातात. समाज व राष्ट्र यांना आयुष्य असते-असायलाच हवे. त्या दृष्टीने ह्या साऱ्या शक्तींना पराभूत करायला हवे. आज राष्ट्रीय स्तरावर जे ध्रुवीकरण होऊ पहात आहे, त्यातही ह्या कसोटचा प्रधान मानल्या जायला हव्यात. ब्रिटिश गुलामीला विरोध करणारांनी रशियन (वा चिनी) गुलाबी 'सोनेरी' वा 'रुपेरी' ('अर्थ' लावून घ्यावा-ज्याचा त्याने) असली तरीही विरोध केला पाहिजे. ती गुलामी आणू चाहणारी व्यक्ति वा पक्ष कितीही मोठा असला तरीही त्याला प्राणपणाने विरोध करणे धर्म्यच ठरते. निवडणुकीत (इथे तरी) पक्ष असतात व ते स्वाभाविकच ! पण पक्षांना जोखून घेताना वरील कसोटचा महत्वाच्या मानल्या पाहिजेत. आज पुन्हा एकदा जातीयवाद, नक्षलवाद, हिंसाचार, विघटनकारी शक्ति प्रतिष्ठेने उभ्या राहू पहात आहेत. अशा शक्तींचा पराभव हे पहिले कर्तव्य. निष्ठाशून्य पक्षबाजांचा पराभव हे दुसरे कर्तव्य. लायक, निष्ठावन्त, राष्ट्रभक्त, सेवापरायण व राष्ट्राची अस्मिता मानणाऱ्या व जपणाऱ्यांचा जय हे तिसरे कर्तव्य. लोकशाही-मूल्यांचा जय हे चवथे कर्तव्य. 'घोषणाबाजी' हाच धर्म मानणारांचा पराभव हे पाचवे कर्तव्य. अवघ्या जीवनाचे सरकारीकरण करायला निघालेल्या सर्वंकष सत्ताबाजीचा पराभव करणे व स्वराज्यातील स्वातंत्र्यसंकोच थांबविणे हे सर्वांत मोठे कर्तव्य होय असे मला वाटते. 'देश ही प्रेम करण्याची वस्तु' म्हणून उरू न देणाऱ्या सर्वच शक्तींचा पराभव जनतेने घडवून आणला पाहिजे. तुमच्या 'राजकारणी', निष्ठाशून्य, मूल्यशून्य खेळातली आम्ही निर्जीव प्यादी नाही आहोत हे सिद्ध करण्याचे दायित्व भारतीय जनतेवर आले आहे.

हे दायित्व ती पार पाडेल व लोकशाही मूल्यांचा ध्वज भारतात फडकत ठेवील असा विश्वास वाटतो. ● ● ●

# समाजवादी अर्थकारण

—स. ह. देशपांडे



## केवळ अर्थसंकल्पासाठी ?

आपल्या समाजवादी ध्येयधोरणांना, आर्थिक प्रयोग-प्रकल्पांना आणि तथाकथित क्रांतिप्रयत्नांना जनतेचा निखालस पाठिंबा आहे किंवा काय ते पडताळून पाहण्यासाठी पंतप्रधानांनी मुदतपूर्व निवडणुकांची घोषणा केली असून, त्यासाठी लोकसभा विसर्जित केली आहे. आज भारतीय जनता निवडणुकीसाठी सज्ज होत आहे. पंतप्रधानांनी आपल्या पुरोगामी कार्यक्रमांना कौल मागण्याची भूमिका विशद केली असून, गेल्या वर्ष दीड वर्षात त्यांनी आखलेली बँक राष्ट्रीयीकरण, तनखेबंदी आदि पुरोगामी पावलांना व धोरणांना भारतीय जनतेचा कसा भरीव पाठिंबा आहे हे सिद्ध करून दाखविण्यासाठीच हे निवडणुकीचे आव्हान स्वीकारले आहे.

"समाजवादा"ची परिभाषा स्वीकारल्याशिवाय आपण पुरेसे पुरोगामी व 'मॉडर्न' नाही असे कुणालाही व कोणत्याही पक्षाला वाटावे असे वातावरण आज सर्वत्र पसरलेले दिसते. आपण ज्याला अस्तित्वात आणणार आहोत तो समाजवाद लोकशाही स्वरूपाचा असला पाहिजे असाही आपला आग्रह आहे. मात्र ज्या प्रकारच्या समाजवादाचा पाठपुरावा आपण करीत आहोत त्यातून लोकशाही खरोखरच जतन होईल की नाही याचा फारसा विचार होताना दिसत नाही.

लोकशाहीच्या मार्गाने म्हणजे मतपेटीतून समाजवाद आला की तो लोकशाही समाजवाद झाला ही समजूत भोळेपणाची आहे. समाजवादी स्वरूपाची म्हणून जी आर्थिक रचना अमलात यावयाची तिचा व लोकशाहीची मूलभूत तत्वे यांचा फार जवळचा संबंध आहे. त्यामुळे आपण उभी करू ती अर्थरचना मुळात लोकशाहीशी सुसंगत असेल की नाही हे तपासून पाहणे जरूर आहे.

'लोकशाही समाजवाद' ह्या शब्द संहतीत काही एक सामाजिक न्याय अभिप्रेत आहे. दारिद्र्याचा नाश व समाजात समता प्रस्थापित करणे हा त्यामागे हेतु आहे, असला पाहिजे. हा हेतु महत्वाचा आहे व ह्या हेतुबाबत सर्वसाधारणपणे कुणाचाच मतभेद असण्याचे काही कारण नाही. प्रश्न हेतूच्या बऱ्या-वाईटपणाचा नाही. त्यासाठी जे मार्ग चोखाळले जातात त्यांच्या बरेवाईटपणाचा आहे.



अनुक्रमणिका

ते आज ज्या पद्धतीचे अर्थकारण केले जात आहे व जे अधिक वेगाने पुढे रेटले जाण्याचा आता धोका निर्माण झाला आहे ते त्या हेतूशी अंतिमतः सुसंगत आहेत असे म्हणता येत नाही.

उदाहरणार्थ, आज आर्थिक क्षेत्रातील शासकीय प्राबल्य झपाट्याने वाढत आहे; सत्ता केंद्रीकरणाला प्रचंड गति आलेली आहे. शासकीय नियंत्रणे प्रचंड प्रमाणात वाढत आहेत. विरोधी आवाज उमटण्याची शक्यता यातून वेगाने कमी होत आहे. मोठ्या खपाची इंग्रजी दैनिके गोरवाला यांची सरकारी धोरणावरील सडेतोड टीका प्रसिद्ध करू धजत नाहीत ही स्थिती आजच प्राप्त झाली आहे. याच प्रवृत्ती पुढे चालू राहिल्या तर जीत गरिबांसाठी भाकरी वा न्याय मागणे हेही मुष्कील होऊन बसेल अशी अवस्था प्राप्त होणे शक्य आहे.

शासनाच्या हाती सत्ता केंद्रित होऊ लागली व राष्ट्रीयीकरणाची (म्हणजेच सरकारीकरणाची) प्रक्रिया वाढू लागली की अनेक धोके संभवतात. त्यातला पहिला धोका मुख्यतः 'लोकशाही' व्यक्तिस्वातंत्र्याच्या संकोच्याचाच आहे. अधिकाधिक सत्ता केंद्रित झाली की अनेक अर्थांनी लोकशाहीत मूलतः अभिप्रेत असलेले व्यक्तिस्वातंत्र्य धोक्यात येते. मलभूत हक्क तितकेसे मूलभूत राहात नाहीत. राष्ट्रीयीकरण वा सरकारी नियंत्रण अतिरिक्त झाले की अकार्यक्षमता वाढण्याची भीति असते. भ्रष्टाचाराला उत्तेजन मिळते, सरकारी अवलंबून वाढते, सरकारी कर्मचाऱ्यांचे समाजातील प्रमाण वाढते, या शक्यता लोकशाहीच्या त्याचप्रमाणे विकासाच्या दृष्टीने उपेक्षणीय नाहीत. आर्थिक प्रगती व लोकशाही या दोन्ही दृष्टींनी समाजातील अधिकांश आर्थिक व्यवहार खाजगी व्यक्ति वा गट वा संघटना यामार्फतच व्हावयास हवेत. योगक्षेम शासनावर अवलंबून नसणे हीच लोकशाही व स्वातंत्र्य यांची खरीखुरी हमी आहे.

याचा अर्थच असा की संपत्तीची खाजगी मालकी व लोकशाही यात फारकत करता येणार नाही याची स्पष्ट जाणीव लोकशाही समाजवाद मानणारांनी ठेवली पाहिजे—लोकशाही अभिप्रेत असेल, तीवर अंतिम श्रद्धा असेल तर खाजगी मालकी हक्कही मूलभूत समजावा लागेल. विचारस्वातंत्र्य, आविष्कारस्वातंत्र्य व संघटना स्वातंत्र्य ही टिकली तरच राज्ययंत्रणेवर समतेच्या दृष्टीने प्रभाव पाडणे शक्य होते.

ही तर भांडवलशाही; मग अशा अवस्थेत समाजवादी ध्येयांचे काय असा प्रश्न मनात येईल. काही महत्वाच्या क्षेत्रात सरकारी मालकी, शासकीय सत्ता असावी असे वर म्हटलेच आहे; परतु अन्य क्षेत्रात खाजगी उद्योगांना विकासाची वाट मोकळी करून दिली जावी असे मात्र निश्चित. समाजवादाचा कार्यक्रम आर्थिक समता व दारिद्रय नाश हाच असला पाहिजे. त्यासाठी सर्वंकष राष्ट्रीयीकरणाची वा सरकारीकरणाची आवश्यकता नाही. करयोजना नीट आखून व करांची वसुली चोख पद्धतीने करून त्यातून उपलब्ध होणारा पैसा विविध प्रकारचे लहानमोठे प्रकल्प उभे करून गरिबांच्यासाठी, बेकारांसाठी व अंततः दारिद्रयविनाशासाठी खर्च करता येईल. प्रत्यक्ष करांची सुधारलेली योजना करून व ते वसूल करण्याची कार्यक्षम यंत्रणा उभी करून हे साध्य होऊ शकेल. ह्या कररचनेत शेतीचे उत्पन्नही वगळले जाऊ नये. करपद्धती अशी असली पाहिजे की जीत सर्व प्रकारच्या उत्पन्नांचा समावेश झालेला असेल.

भाववाढ रोखणे हा दुसरा कार्यक्रम राहील. समाजवादाची भाषा बोलली जात असतानाच गरिबांना अधिक गरीब करणारी व श्रीमंतांना अधिक श्रीमंत करणारी तुटीच्या अर्थसंकल्पांचीच योजना गेली कित्येक वर्षे चालू आहे.

लोकसंख्या नियंत्रण हा तिसरा कार्यक्रम हाती घेणे समाजवादाचे दृष्टीने महत्वाचे आहे. लोकसंख्येच्या वाढीला आळा घालण्याची नवी तंत्रे हे खरे म्हणजे आज विकसनशील राष्ट्रांना लाभले वरदान आहे. भांडवलशाही देशांच्या विकासाच्या काळात ही तंत्रे उपलब्ध नव्हती. साम्यवादी देशात लोकसंख्या नियंत्रणाला तात्त्विक विरोध असल्याने ती उपलब्ध असूनही वापरली जात नाहीत. विकसनशील अशा आपल्या देशाच्या संदर्भात व समाजवादाच्या दृष्टीने हे महत्वाचे कार्य ठरते.

सर्वंकष शिक्षणप्रसार हाही लोकशाही मूल्ये व समाजवाद यांच्या दृष्टीने महत्वाचा कार्यक्रम मानला गेला पाहिजे. प्राथमिक शिक्षण सक्तीचे व निःशुल्क करणेही गेल्या तेवीस वर्षांच्या नियोजनाने साधले नाही व १९८५ पर्यंतही ते ध्येय साधणार नाही असा खुद्द शिक्षण मंत्रालयाचाच कयास आहे.

नियंत्रणे आणि राष्ट्रीयीकरण या स्वरूपाचे नियोजन अमलात आणले की, नोकरशाहीची व्याप्ती वाढते व तिचा अनेक प्रकारांचा जाच अर्थव्यवस्थेला भोवू लागतो. प्रशासकीय नियोजन हे स्वभावतःच उपक्रमहीन, चाकोरीतले आणि अकार्यक्षम असते. या विधानाला अर्थात काही अपवाद दाखविता आले तरी सर्वसाधारणपणे ते बरोबर आहे हे पटविण्याची आवश्यकता आहे असे वाटत नाही.



अनुक्रमणिका

याचबरोबर हेही खरे की अविकसित देशाला गतिप्रवण करण्यासाठी काही विशिष्ट क्षेत्रात सरकारी हस्तक्षेपाची गरजही असते. यामधून मध्यम मार्ग काढणे अवश्य आहे. आणि असा मध्यम मार्ग काढणे हे उत्तम प्रशासकांची तीव्र टंचाई लक्षात घेता फारच जरूर आहे. अविकसित देशात इतर अनेक प्रकारच्या साधनसामग्रीची जशी टंचाई असते तशीच कुशल आणि कार्यक्षम प्रशासकांचीही असते. हे लक्षात घेतले तर अशा मर्यादित प्रशासकीय मनुष्यबळाचा उपयोग योग्य त्या क्षेत्रातच परिणामकारकपणे करून इतर क्षेत्रांत त्याची अनावश्यकपणे होणारी उधळपट्टी टाळणे हाही विकासोन्मुख नियोजनाचा एक अवश्य भाग गणला पाहिजे.

या विचारांतूनही अगोदर उल्लेखिलेला खाजगी उपक्रमांच्या उत्तेजनाचा विचार अधिक बळकट होतो. अशा उपक्रमांची व्याप्ती जितकी अधिक तितका सरकारी प्रशासनावर पडणारा भार कमी हे स्पष्ट आहे.

मालमत्तेची खाजगी मालकी, खाजगी उपक्रम, खाजगी व्यापार या गोष्टी लोकशाही समाजवादाशी मुळीच विसंगत नाहीत. खाजगी उपक्रमांची आणि बाजारपेठांची रचना हे राष्ट्राच्या आर्थिक गरजा भागविणारे एक सर्वसाधारणपणे कार्यक्षम असे साधन आहे. हे साधन विषम समाजरचना निर्माण करण्यासाठी जसे वापरता येते तसेच समान समाजरचना निर्माण करण्यासाठीही वापरता येते. अर्थव्यवस्थेतून स्पर्धा नाहीशी होत असेल आणि तीनही मक्तेदारीच्या स्वरूपात संपत्तीचे केंद्रीकरण होत असेल तर इतर आर्थिक धोरणांचा शह तिला देता येतो. सामाजिक उद्दिष्टांसाठी तिचे नियमन करता येते.

दारिद्र्यविनाशासाठी बेकारीनिवारणाचा फार मोठा कार्यक्रम हातात घेणे आणि त्यासाठी लागणारा पैसा कररूपाने समाजातील सर्वाधिक श्रीमंत वर्गाकडून वसूल करणे हा समाजवादाचा या घडीचा महत्त्वाचा कार्यक्रम असावयास पाहिजे. खाजगी मालकी व व्यवहार यांचा साचा बहुतांशी कायम ठेवून हे करणे शक्य आहे. या प्रकारच्या समाजवादाचा अवलंब केल्यानेच लोकशाही जिवंत राहू शकेल आणि आर्थिक विकास अधिक वेगाने घडून येईल.

याचा अर्थ करांचे ओझे आज आहे त्यापेक्षा फार अधिक वाढवावयास हवे असेही नाही. अनावश्यक खर्च कमी करून अनेक प्रकारची बचत करणे शक्य आहे. वर ज्या प्रकारच्या आर्थिक चौकटीचा पुरस्कार केला आहे तीत अनावश्यक सरकारी काम कमी होत असल्यामुळे खर्चात मोठ्या प्रमाणावर काटकसर होईल. करांचे ओझे आज मोठे दिसत असले तरी त्याचा भार अर्थव्यवहाराच्या काही क्षेत्रांवर प्रमाणापेक्षा अधिक आणि इतर क्षेत्रांवर कमी अशी स्थिती आहे. ती बदलून हे ओझे अधिक सुसह्य करण्याला वाव आहे. करचुकवेपणाला शासन करूनही करांचे उत्पन्न कोटयवधी रुपयांनी वाढविणे शक्य आहे.

समाजवादाची वर निर्दिष्ट केलेली चौकट खाजगी मालकी व खाजगी अर्थव्यवहार यांना मध्यवर्ती स्थान देणारी असली तरी ती भांडवलशहांच्या किंवा श्रीमंतांच्या बाजूची आणि म्हणजे 'प्रतिगामी' नाही हे ध्यानात घेतले पाहिजे. राष्ट्रीयीकरणादी विशिष्ट मंत्र उच्चारले म्हणजे माणूस पुरोगामी होतो असे म्हणणे चूक आहे. समाजातील दलितांना दारिद्र्यातून वर खेचण्याचा भार श्रीमंतांवरच पडणे अटळ आहे आणि तीच या लेखामागचीही भूमिका आहे. मात्र असे करीत असताना आर्थिक विकास, लोकशाही आणि सामाजिक न्याय या तत्त्वांना धक्का पोचणार नाही यासाठी परंपरागत समाजवादाचे मार्ग आंधळेपणाने न स्वीकारता इतर मार्ग चोखाळले पाहिजेत. भारतातल्या लोकशाही समाजवादाची शोकांतिका अशी की, त्याची लोकशाहीवर एक तत्त्व म्हणून कदाचित् श्रद्धा असली तरी लोकशाहीच्या मूलभूत संस्थाजीवनाची त्याची जाण अपुरी आहे. त्यामुळे कळत नकळत हा 'समाजवाद' आर्थिक एकसत्तेकडे आपणाला खेचून नेणार की काय आणि असे करीत असताना लोकशाहीसह खऱ्या समाजवादी मूल्यांचीही आहुती घेणार काय अशी भीती उत्पन्न झाली आहे.

● ● ●












# 'दीपावली' रजत-रजनीचा अपूर्व सोहळा

९ जानेवारीची ती सुरम्य संध्याकाळ; साडेपाचच्या सोनेरी उन्हात बरेच मराठी साहित्यिक चौपाटीवरील बिर्ला क्रीडा केंद्राकडे गटागटाने जाताना दिसत होते. प्रवेशद्वाराजवळच 'दीपावली : रजत महोत्सवी रजनी' असा सुंदर फलक झळकत होता आणि त्यावर भरगच्च पुष्पहारही लटकत होता. त्या फलकामुळे साहित्यिकांच्या बिर्ला क्रीडा केंद्रावरील आगमनाचे कारण कुणालाही समजले असते.

प्रवेशद्वाराजवळच 'दीपावली' मासिकाचे संपादक श्री. दीनानाथ दलाल आणि त्यांचे सहकारी निमंत्रित पाहुण्यांचे हास्यमुखाने स्वागत करीत होते. आलेले साहित्यिक केंद्राच्या मोकळ्या पटांगणावरील वर्तुळाकार मांडून ठेवलेल्या खुर्च्यांवर बसून गप्पागोष्टींमध्ये रंगून गेलेले दिसत होते. दलाल आर्ट स्टुडिओतले कुशल छायाचित्रकार गणपतराव बांदोडकर गटागटाने उभ्या असलेल्या साहित्यिकांना आपल्या कॅमेऱ्याने टिपून घेण्यात गर्क झाले होते.

गेल्या म्हणजे १९७० च्या दिवाळी अंकाबरोबरच 'दीपावली'ने सव्विसाव्या वर्षात पदार्पण केले, तेव्हापासूनच 'दीपावली'चे निकटवर्ती लेखक 'दीपावली'चा रौप्यमहोत्सव साजरा करण्याची भाषा बोलू लागले. श्री. अरविंद गोखले नि श्री. अच्युतराव वर्वे यांनी तर असा एक समारंभ आयोजित करून निमंत्रणाची पत्रेही तयार करून आणली होती; पण श्री. दलाल यांनी अशाप्रकारच्या समारंभातील ते सत्कार नि इतर सोपस्कार यांचा संसर्गही आपणांस लागू नये म्हणून विनयपूर्वक पण निर्धाराने स्पष्ट नकार दिला. त्याऐवजी स्वतःच एक स्नेहसंमेलनासारखा छोटासा समारंभ घडवून आणण्याची कल्पना श्री. दलाल यांनी आपल्या मित्रांपुढे मांडली. हा पर्याय अर्थातच सर्वांना मानवण्यासारखा होता. गोखले-वर्वे प्रभृतींनी त्याला तत्काळ मान्यता दिली.

१९७० च्या दिवाळी अंकाच्या कामातून मोकळे झाल्यावर स्नेहसंमेलनाच्या तयारीला सुरुवात झाली. 'दीपावली'चे लेखक, जाहिरात एजंट, चित्रकार, हितचिंतक प्रभृतींच्या याद्या तयार झाल्या. बिर्ला क्रीडा केंद्राचे छोटेसे सभागृह मुक्रर करण्यात आले. साहित्यिकांचा परस्पर परिचय नि गप्पाटप्पा, नंतर स्नेहभोजन आणि रात्री गायनाची मैफल असा सुटसुटीत कार्यक्रम नक्की ठरला. गोखले-वर्वे व दलाल यांच्या सह्यानिशी आमंत्रणे रवाना होऊ लागली. त्यातच लंडन-विशेषांकाच्या कामाची भर पडली. वास्तविक हा अंक दि. २६ जानेवारीला प्रसिद्ध व्हावा अशी आधीची योजना होती; पण लंडनच्या संयोजक-मित्रांनी तो अंक 'जानेवारी-अंक' म्हणूनच प्रसिद्ध होणार असे पूर्वीच जाहीर केल्यामुळे आयत्यावेळी तो विशेषांक जानेवारीचा अंक म्हणून प्रकाशित करण्याचे ठरले. त्याच घाईगर्दीमध्ये स्नेहसंमेलनाच्या निमंत्रण पत्रिका पाठविण्याचीही गडबड सुरू झाली. (त्यामुळे अनवधानाने कुणाला निमंत्रणे मिळाली नसल्याचीही शक्यता आहे.)

त्याच साहित्यिक मित्रांनी आपण संमेलनाला येणार असे कळवले. प्रा. ना. सी. फडके, श्री. वि. स. खांडेकर, श्री. ग. दि. माडगूळकर, श्री. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज), श्री. पु. ल. देशपांडे, श्री. माधवराव राजवाडे, श्री. महादेवशास्त्री जोशी, चित्रकार द. ग. गोडसे, श्री. वसंत कानेटकर, श्री. वामन चोरघडे, श्री. प्रभाकर पाध्ये, श्री. अशोक रानडे, श्री. राजेंद्र बनहट्टी, श्री. द. म. मिरासदार, सौ. मालतीबाई बेडेकर, श्री. पु. रा. बेहेरे, श्री. ह. मो. मराठे, डॉ. सरोजिनी बावर, प्रभृती साहित्यिकांनी आपण समारंभाला येऊ शकत नसल्याबद्दल कळवून दिलगिरी व्यक्त केली होती. श्री. जयवंत दळवी, श्री. मंगेश पाडगांवकर, श्री. वा. रा. कांत, प्रभृतीनीही त्याच दिवशी कामानिमित्त बाहेरगांवी जावे लागल्यामुळे संमेलनाला उपस्थित राहता येत नाही याबद्दल हळहळ व्यक्त केली.

संमेलनाला प्रारंभ करण्याची वेळ साडेपाच अशी जाहीर केली होती. आपल्या नेहमीच्या पद्धतीने साडेपाच म्हणजे साडेसहा होणारच अशी अनेकांची कल्पना होती; पण बरेच साहित्यिक मित्र साडेपाचच्या आधीच आले आणि त्यांनी संयोजकांची कल्पना चुकीची ठरविली. बिर्ला क्रीडा केंद्राबाहेरच्या हिरवळीवर साहित्यिकांच्या गप्पांच्या मैफली रंगू लागल्या. मावळत्या सूर्याच्या साक्षीने प्रकाशक–लेखक यांच्यात पुस्तक-प्रकाशनाचे मनसुबेही ठरू लागले. या संमेलनाचे स्वरूप खरोखरीचे अनौपचारिक असल्याने लहानथोर साहित्यिक मंडळी अगदी मनमोकळेपणाने बोलत होती, किस्से सांगत होती, गप्पागोष्टींना ऊत आला. काही साहित्यिकांच्या नव्याने ओळखी होत होत्या तर काहींच्या जुन्या ओळखींना उजाळा मिळत होता. त्यातच 'दीपावली'चे लंडनमधील स्नेही श्री. माधव जोशी, श्री. मुकुंद सोनपाटकी आणि सौ. सोनपाटकी यांचाही समावेश होता. लंडनसारख्या परक्या देशातही तेथील मराठी मंडळींनी अमृतातेही पैजेने जिंकणाऱ्या मायमराठीचा झेंडा कसा फडकवत ठेवला आहे हे त्यांच्या गप्पांमधून समजत होते. उपस्थित असलेल्या मित्रमंडळींमध्ये खालील व्यक्ती प्रामुख्याने दिसत होती: श्री. पां. वा. गाडगीळ, श्री. मो. ग. रांगणेकर, प्रा. ग. ना. लवंदे, प्रा. म. वा. धोंड, प्रा. सदानंद रेगे, प्रा. म. मा. आळतेकर, प्रा. सुभाष भेंडे, सुधीर फडके, अनंतराव कुळकर्णी, गणेशराव तांबे, चित्रकार गांगल, श्री. श्रीराम कामत, ॲ. ना. व्यं. देशपांडे, श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी, सौ. व श्री. भिकू ह. पै. आंगले, श्री. अरविंद ताटके, श्री. गोविंदराव तळवलकर, श्री. दा. रा. सामंत, श्री. राजाराम हुमणे, श्री. दि. वि. गोखले, श्री. रा. धों. वाकरे, श्री. रवींद्र पिंगे, श्री. सुरेश वेंगुर्लेकर, श्री. मधु मंगेश कुळकर्णी, श्री. वि. वा. पत्की, श्री. आनंद साधले,



अनुक्रमणिका

श्री. श्याम जोशी, पं. सीताराम फातर्फेकर, श्री. पंडित अ. कुळकर्णी, सौ. सुमति कुळकर्णी, श्री. ग. पां. परचुरे, श्री. वसंत देशमुख, श्री. अनंत वि. वेडेकर, श्री. मनमोहन नातू, श्री. बाबूराव बागवे, श्री. सीताराम ग. मणेरीकर.

थोडासा अंधार होताच हिरवळीभोवतालचे दीप प्रकाशित झाले आणि वातावरण त्या उजेडात झळाळून गेले. चौपाटीने साग-राच्या लाटांना अडवून धरले असले तरी समुद्रावरून येणाऱ्या आल्हाददायक वायुलहरींना मज्जाव नव्हता. तशा त्या सुप्रसन्न वातावरणात स्नेहभोजनाचा कार्यक्रम सुरू झाला. स्वतः दलाल सर्वांचा परामर्ष जातीने घेत होते. जेवणाला प्रारंभ झाल्यावर थोड्याच वेळात शिवसेनाप्रमुख श्री. बाळासाहेब ठाकरे समारंभ-स्थानी येऊन उपस्थित झाले. सध्याच्या निवडणुकांबाबतच्या पक्षोपपक्षांमधील वाटाघाटींची पर्वे चालू असल्याने ते वेळात वेळ काढून मुद्दाम आठवणीने आवर्जून आले याबद्दल सर्वांनाच आनंद वाटला. 'दीपावली'बरोबरचे त्यांचे जुने स्नेहसंबंध अद्यापि कायम असल्याचाच तो पुरावा होता. संमेलनात हजेरी लावून लगेच परतायचे असे त्यांनी ठरविले होते; पण दलाल यांनी त्यांना 'निदान तोंड गोड करून गेले पाहिजे' असे आग्रहपूर्वक सांगितल्यावर त्यांचा नाइलाज झाला. तेवढ्या छोटयाशा वेळातही त्यांना त्यांचे बरेच साहित्यिक मित्र भेटले. सौ. सुमतीबाई दलाल थोडा वेळ बोलून ते आपल्या सभेसाठी तातडीने रवाना झाले.

स्नेहभोजनानंतर थोड्याच वेळाने केंद्रावरील सभागृहात गाण्याचा जलसा सुरू व्हावयाचा होता, पण दलाल यांच्या काही मित्रांनी आजच्या समारंभाचे प्रयोजन सांगण्यासाठी आणि आपल्या भावना व्यक्त करण्यासाठी त्यापूर्वी एक सभा आयोजित करावी असा आग्रह धरला. दलाल यांनी त्या गोष्टीला सशर्त मान्यता दिली. त्यांची शर्त अशी की, वक्त्याने दलालांसंबंधी न बोलता 'दीपावली आणि मी' या विषयावरच आणि थोडक्यात बोलले पाहिजे. दला-लांची मान्यता मिळाल्यावर सर्वजण सभागृहाकडे वळले; पण त्याच वेळी तेथे एक सत्कारसमारंभ चालू असल्याने सर्वांना बाहेर थांबावे लागले. तो समारंभ रात्री ८ वाजता संपावयाचा होता. पण साडे-आठ झाले तरी समारंभ संपण्याची चिन्हे दिसेनात, तेव्हा दर दोन मिनिटांनी त्या समारंभाच्या संयोजकांना निरोप जाऊ लागले. शेवटी ९ वाजता सभागृह मोकळे झाले आणि साहित्यिकांनी तेथे आपली बैठक जमवली. अगदी थोड्याच वेळात पुढला पडदा दूर झाला आणि मंद-धूसर प्रकाशात 'दीपावली'च्या लेखकांच्या तीन पिढ्यांचे प्रतिनिधी रंगमंचावरील खुर्च्यांवर विराजमान झालेले दिसले. मागील बाजूला श्री. प्रकाश मळकर्णेकर, श्री. रामकृष्ण नायक आणि त्यांचे कलाकार मित्र यांनी तयार केलेले सुशोभित नेत्रदीपक नेपथ्य समारंभाच्या भव्यतेत भर घालीत होते. श्री. अशोक परांजपे यांनी आपल्या काव्यमय ललितमधुर शब्दांनी सर्व पाहुण्यांचे 'दीपावली'च्या वतीने स्वागत केले आणि सभेच्या संच-लनाची सूत्रे श्री. प्र. श्री. नेरुरकर यांच्याकडे सोपविली.

श्री. नेरुरकर यांनी समारंभाचे प्रयोजन सांगितल्यावर निवडक मित्रांनी अगदी पाचच मिनिटात 'दीपावली'बाबतच्या आपल्या भावना व्यक्त कराव्या असे बंधन घालून प्रथमच प्रा. अनंत काणेकर यांना बोलण्याची विनंती केली. त्यांच्या भाषणानंतर श्री. ग. रा. कामत, प्रा. मं. वि. राजाध्यक्ष, श्री. पु. भा. भावे, श्री. सोपानदेव चौधरी, श्री. रवींद्र पिंगे, श्री. प्रभाकर पेंढारकर प्रभृतींची भाषणे झाली. शेवटी श्री. प्रभाकर अत्रे यांनी आभार मानले.

हा कार्यक्रम अत्यंत हृद्य झाला. त्यात कोठेही कृत्रिमतेचा लवलेशही आढळा नाही; त्यामुळे कुठेही कंटाळवाणेपणा दिसला नाही. या समारंभानंतरचा पुढील कार्यक्रम म्हणजे पं. जितेंद्र अभिषेकी यांचे श्रुतिमधुर गायन. अभिषेकींनीही ही मैफल रंगवून आजीच्या कार्यक्रमाच्या यशस्वितेमध्ये भरच घातली.

'दीपावली'च्या स्नेहसंमेलनाचा हा कार्यक्रम कित्येकांच्या स्मरणात कायम राहील.

**–एक आमंत्रित**

---

(पान ६५ वरून)

सरवटेने विश्वनाथ वझेच्या थोबाडीत मारणे (विश्वाला शांती हवी), रेल्वे अपघातात कामगारांचा हितकर्ता भगवान एकाएकी मरणे (कीर्तिस्तंभ) इ. या सर्व घटना कथेची आकर्षकता वाढवीत असल्या तरी कथामूल्य कमी करतात असे म्हटले पाहिजे.

उपरोक्त घटनाप्रधानतेबरोबरच काही कथांवर वर्तमानिकतेची छाप पडलेली आहे. 'विश्वाला शांति हवी'मधील वादस्पर्धा, 'तीन दिवस'मधील नव्या जुन्याचा संघर्ष, 'सेवामूर्ति'मधील तात्याजींची भाषणे, ही काही ठळक उदाहरणे. या विचारप्रधानते-मुळे निष्कारण रसहानी होते.

कमलाकर धारपांच्या कथेचा आणखी एक जाणवणारा विशेष म्हणजे या कथांतून येणारी निसर्गचित्रे. प्रवासवर्णनाबरोबरच तेथील निसर्गदृश्ये लेखकाने चांगली टिपली आहेत. उदा. भूलभूलैया, तीन दिवस या कथा.

'मुग्धा' या संग्रहात अशी एक कथा आहे की, तिला कथा का म्हणावे हेच समजत नाही. पुणे ते पाली प्रवास, तेथे जाऊन ग्रामस्थांसोबत वरदायिनी देवीचे दर्शन, भोजन, चर्चा व परत येणे एवढा कथा भाग. त्यामुळे ही कथा 'कथा' न वाटता प्रवासवर्णन वाटते!

'मुग्धा'मधील दोन कथा मात्र उल्ले-खनीय आहेत. 'मुग्धा' ही एका तरुण मुलीच्या मृत्यूची कथा. तिच्यावर प्रेम करणारा लेखक स्वतःला अपराधी समजतो. आपण त्या मुलीच्या मृत्यूला कारणीभूत आहोत ही कल्पना त्याला सारखी टोचत असते. या अनुभवातून 'मुग्धा' कथा निर्माण झाली आहे. 'परिवर्तन' ही कथा एका नवविवाहित स्त्रीच्या बदलत्या मनो-वृत्तीचे दर्शन घडविते. या दोन कथांचा अपवाद वगळल्यास इतर कथा सामान्य आहेत असे म्हणावेसे वाटते.

**–विश्वनाथ शं. चौघुले**

(**मुग्धा** लेखक–कमलाकर धारप; उषा प्रकाशन, नागपूर–१; किंमत तीन रुपये.)



## एक आगळे व समर्थ नाटक

# न ट स म्रा ट

'नाटके उदंड आली' असली आणि तेही एका मर्यादित अर्थाने सुचिन्ह मानण्यासारखी परिस्थिति 'मराठीचिये नगरी' असली तरीही चांगली नाटके उदंड जाली व मराठी नाटकांप्रमाणेच मराठी माणूसही आता वाढतो आहे, मोठा होतो आहे असे म्हणण्यासारखी स्थिति नाही. त्यामुळेच काही मोठे, मोठ्या ताकदीचे, मोठ्या व खोल अशा आशयाचे, महत्तमाला गवसणी घालण्याचा प्रयत्न करणारे नाटक ( वा नाटके ) पाहिले की मनाला आनंद लाभतो. 'लौकिका'त रमणाऱ्या पण अलौकिकाचा वेध घेऊ शकणाऱ्या मानवी प्रज्ञा-प्रतिभेचा स्पर्श लेवून जेव्हा अशा काही कलाकृति रंगमंचावर येतात तेव्हा महत्तमाचा शब्दवेध घेणाऱ्या त्या नाटकांबद्दल व नाटककारांबद्दल आदर दुणावतो. शिरवाडकर-कानेटकर ही नावे मराठी रंगमंचाला नवीन नसली व आपल्या ताकदीचा प्रत्यय त्यांनी यापूर्वीच दिलेला असला तरीही दोघांची नवीन नाटके त्याचा पुनः प्रत्यय देऊन जातात.

दि गोवा हिंदु असोसिएशनच्या कलाविभागाने आपल्या सुवर्ण महोत्सवाच्या निमित्ताने नव्यानेच सादर केलेल्या "**नटसम्राट**" ( वि. वा. शिरवाडकर ), **मीरा-मधुरा** ( प्रा. वसंत कानेटकर ) या दोन नाटकांबद्दल विषय आशय व अभिव्यक्तीत भिन्नत्व असले तरी ही नाटके निःसंशय मोठ्या आशयाची, मनाला उदात्ततेचा स्पर्श देऊ शकणारी अशीच आहेत. अशी मोठ्या आशयाची नाटके निवडण्यात व ती कलात्मकतेने रंगमंचावर सादर करण्यात दि गोवा हिंदु असोसिएशनने जो साक्षेप दाखविला आहे त्याबद्दल तिच्या चालकांचे अभिनंदन करतो.

"नटसम्राट" ही मराठी रंगभूमीवर 'इतिहास' निर्माण करू शकणाऱ्या व गडकरी-खाडिलकर यांची शाबासकी मिळवू शकणाऱ्या एका नटश्रेष्ठाची कहाणी सांगते. त्या नटश्रेष्ठाचे नाटकातले नाव गणपतराव बेलवलकर असे असले तरीही ह्या नाटकातील अनेक संदर्भ वरचं काही सांगून जातात. गणपतराव बेलवलकर नावाच्या कुणा एका नटश्रेष्ठाची शोकांतिका रंगवीत असताना ती केवळ एका विशिष्ट 'नटसम्राटा'ची न वाटता कुणाही एका वृद्धाची, ज्याच्या जीवनाला 'स्वप्नां'ची किनार लाभलेली आहे अशा कुणाही एका वृद्धाची ती कथा वाटावी. अशा तऱ्हेचा व्यापक व सार्वकालिक स्तर प्रस्तुत नाटकाला लाभला आहे. माणसाच्या जीवनाला स्वप्नांची, भासांची, ध्यासांची किनार असतेच. ही स्वप्ने, भास व ध्यास जव्हा जेव्हा मोठे होतात तेव्हा त्यातून काही मोठे निर्माण होते आणि त्याचवेळी ते मोठेपण समजू न शकलेल्या भोवतीच्या माणसांमुळे शोकात्म नाट्याची नांदीही म्हटली जाते. गणपतराव बेलवलकर यांच्या सेवेचा गौरव केला जातो. त्यांना चाळीस हजारांची थैली दिली जाते. 'नटसम्राट' म्हणून स्तुतीची फुले उधळली जातात. त्या तृप्तीच्या क्षणी निवृत्तीची भाषा तोंडून निघते. पहिले स्वगत प्रदीर्घ असले तरीही नाटकाचा पुढला आलेख सूचित करणारे असेच आहे. त्या तृप्त स्वगताच्या पार्श्वभूमीवर नंतरचे जे आघात आहेत ते अधिक हृद्य वाटतात. विरोधी प्रतिमांच्या आणि प्रकृतीच्या पार्श्वभूमीवर आपल्या स्वप्न, ध्यास व भासांवर जगणाऱ्या व त्यांचीच खरीखुरी साथ-सोबत मनोमन मानणाऱ्या गणपतराव बेलवलकर या नटसम्राटाच्या मनःपिंडाची जाण येते. ती हृद्य वाटते. आगळी वाटते. एका अर्थाने ही माणसे लौकिकात अलौकिक आणि अलौकिकात लौकिक अशी असतात. आणि यांच्या मनातले हे द्वंद्व त्या उंचीवर गेल्याशिवाय समजणे अशक्य असल्याने व ती ताकद 'लौकिका'चीच स्वप्ने-ध्यास लावून घेणाऱ्या जगात नसल्याने अशा 'गणपतरावां'ची परवड अपरिहार्य ठरते. ह्या नाटकातली त्यांची पत्नी ( कुणी एक कावेरी ), पुत्र ( नंदा ), कन्या ( नलू ), नौकर ( विठोबा ), राजा ( बूट पॉलिशवाला ) व त्यांची नात आदि सर्व माणसे तशी चांगली. विकृत वृत्तीची वा विषारी मनाची नव्हेत. आणि तरीही गणपतराव बेलवलकर ह्या सद्गृहस्थ नटाची शोकांतिका होते असे रंगविण्यात लेखकाने ही अपरिहार्यताच जणु चित्रित केली आहे. शोकांतिकेचा हा प्रकार उच्च स्तरावरचा व खोलवर विचार करायला लावणारा असा आहे. निवृत्त गणपतराव हे नंदाकडे रहात असताना त्यांच्या वागण्यात जे 'गैर' म्हणून रंगविण्यात आले आहे ते गैर कसे हे त्यांना समजत नाही. ज्या अलौकिकाच्या ध्यासात त्यांनी जीवन व्यतीत केले त्यात असल्या सामान्य (वाटणाऱ्या) व्यवहारांना नगण्यच स्थान होते. भज्यांच्या सोबतीत भास जपले व ध्यासांतून गुलबकावलीचे फूल हाती आले. पण सून मुलगा त्या सामान्य (वाटणाऱ्या) गोष्टींनी अस्वस्थ होतात व असाम... कर्तृत्वाला एकाकी सोडून देतात. इथे त्यांची ही चूक नाही असे वाटत राहते. नियतीने टाकलेल्या पेचातील अपरिहार्यता ध्यानी येते.

मुलीकडे ते येतात. तेथेही पुन्हा 'लौकिक' भजी व अलौकिक गणपतराव जोशी याबद्दलची श्रद्धाच आडवी येते आणि मानी गणपतरावांवर चोरीचाही आळ येतो. 'हे अती झालं' असं म्हण-






तानाच पत्ता साडून जाते. आणि आधाराविना ते सैरभैर होतात. जगाच्या दृष्टीने भ्रमिष्ट झालेल्या व वेडेपणाच्या सीमेवर उभ्या असलेल्या गणपतरावांच्या वेडातही काही शिस्त होती. त्यांची स्वगते म्हणजे काव्य व मूलगामी, सखोल तत्वज्ञानाचा आविष्कार होय! सैरभैर अवस्थेतही स्वप्न-ध्यासांची सोबत लाभलेला हा नटसम्राट त्या उंचीवरच राहतो आणि त्या उंचीवर अज्ञतानाच मरतो. ती फरपट व तो मृत्यु हा अपरिहार्य ठरतो. मन विषण्ण होते. ही माणसे चांगली असूनही अशी शोकांतिका कशी अपरिहार्य ठरते याचे सूचन उत्तमपणे होते. त्यासाठी त्यांचे 'नाटकात हरवणे' कलात्मकरीत्या वापरले गेले आहे. नाटकातली ती वाक्ये वा प्रसंग व नाटकाचा एकूण भाग यांचा सुरेख सांधा जमला आहे. स्टेशन-वरला प्रसंग, दुसऱ्या अंकातील आऊट-हाऊसमधील गणपतराव-कावेरी यांचा वृद्धत्वी प्रणयाचा प्रसंग हे सुरेख लिहिले गेले आहेत. 'मला किती सवती होत्या?' हा कावेरीचा प्रश्न आणि त्यानंतरचे गणपतरावांचे दिलखुलास स्पष्टीकरण–मला वाटतं, मराठी नाटकात असे वृद्धांचे जीवनातील काव्यात्म व नर्म शृंगाराची झालर असलेले प्रसंग क्वचितच रेखाटले गेले असतील. सामान्य वाटणारा व लौकिक दृष्ट्या गडी असलेल्या 'विठोबा'लाच फक्त गणपतरावांचा खरा-खुरा परिचय झाला होता हे रंगविण्यात लेखकाने कौशल्य दाखविले आहे. नातीसाठी गाडीमागे धावणाऱ्या अलौकिक गृहस्थीचाही परिचय स्टेशनवरल्या प्रसंगात यतो. त्यामानाने नाटचगृह, बूट-पॉलिशवाला, तेथले कुणी दोन प्रेक्षक, त्यांची गणपतरावांबाबतची चर्चा, मुलांना घरी जाण्यासाठी दिलेला नकार आदि प्रसंग पुरेसे फुलले–रंगले आहेत असे वाटत नाही. बूट पॉलिशवाला स्टाइलिश वाटला तरी त्याची उत्कटता पुरेशी ठसत नाही. असे असले तरीही मूळ नाट्यवस्तु अतिशय समर्थ, आगळी व अंतर्मुख करणारी अशी आहे. भाषा हे नाटकाचे खास शिरोभूषण! काव्य, तत्वज्ञान यांचा सुरेख संगम तीत झाला आहे. त्याशिवाय काही सूचनही मजेशीरपण आले आहे–उदा. डॉक्टर भालेरावांसंबंधीचा उल्लेख करून शिर-वाडकरांनी फार मोठे समाज ऋण व कला-ऋण फेडले आहे असे मला वाटते. आजच्या रंगभूमीच्या गति-प्रगतीचे शिल्पकार भालेराव आहेत हे जाणकारांना ठाऊक आहेच. जनतेला ते कळले पाहिजे. हे काम येथे साधते.

प्रयोगाबाबत खूपच म्हणता येईल. पण डॉ. श्रीराम लागू (बेलवलकर), शांता जोग (कावेरी) यांच्या कामांबाबत केवळ 'गौरव' करणे उचित. हा नटसम्राट उभा केलाय् तो लागूंनी! विविध रसांची मागणी करणारी ही ताकदीची भूमिका–ते जगले आहेत. गणपतराव जोशी, नानासाहेब फाटक परंपरेतला आजचा श्रेष्ठ गद्य नट म्हणून डॉ. लागूंचा गौरव करणे उचित वाटते. आवाजाची पट्टी झकास लागली आहे. 'वृद्ध' नटसम्राटाला ती साजेशी. मुलीकडला एक प्रसंग सुरेख! गणपतराव जोशांबद्दल कळवणकर (बॉस) काही शेरे ताशेरे झाडतो. तेव्हा डॉ. लागू जे



## काळा पोशाख

काळाच पोशाख तुला का हवा?
निळा? गुलाबी? पांढराशुभ्र? पारवा?
नको? अगदी गर्द काळाच हवा?
येईन हं, येईन उद्यापरवा...
आलेय रे... बाहेर ये! ये लौकर!
अं? हे काऽऽय येऊ नंतर?
का पण? यायचं काळ्या रात्री?
फलतील काळ्याच काळ्या गात्री...
मला नाही समजत त्यातलं काही
होतेय अशी अंगाची लाही लाही?
उतरू कसा हा पोशाख? दे ना हात!
अंगावर येतोय समुद्रच.. घेना आत?
आता झालेच आहे काळ्या पोशाखाची
कशाला वाट पहातोस काळ्या रात्रीची?

**–नीलिमा पोवळे**

बारकावे दाखवतात ते केवळ हृद्य! शांता जोगांची भूमिका अप्रतिम! सुजाणपणे व समर्थपणे, तोल कायम ठेवून केलेली! अंगांगातून त्या 'कावेरी' जगल्या. 'कावेरी'मय झाल्या. वृद्धत्वी तृप्त व प्रसन्न 'शृंगार' प्रसंगात तर त्यांनी रस व रंग भरला. अभिनंदन!!

इतर भूमिकात कृष्णकांत दळवी (नंदा), कुमुद चासकर (नलू), भाऊ बिवलकर (विठोबा), माधव अत्रवल (बूट पॉलिश-वाला), वीना म्हापसेकर (नात) यांचा खास उल्लेख करायला हवा.

नेपथ्यकार रघुवीर तळाशिलकर यांनी स्टेशन, नाट्यगृह, पुलाचा काही भाग 'साकार' केला, बोलका केला. कामगिरी सुयोग्य.

दिग्दर्शक दारव्हेकर यांचेही अभिनंदन. नाटक चोख बसविले म्हणून!

विठोबाची भूमिका (१ ला प्रयोग) वठवून रंगलेल्या अवस्थेतच रंगभूमीला रामराम व जीवनाला अखेरचा मुजरा करणाऱ्या नटवर बाबूराव सावंतांना ह्या निमित्ताने मानाचा प्रणाम!!

**--आदित्य**




**'कथा सृजनाची'**

**मंतरलेले बेट**

**मुग्धा**

# साहित्यात काल्पनिक असे काहीच नसते

श्री. प्रभाकर अत्रे यांनी काही मान्यवर निवडक साहित्यिकाना त्यांच्या कलानिर्मितीबद्दल काही निवडक प्रश्न विचारले आणि मोठ्या कुशलतेने त्यांनी त्यांच्याकडून त्यांच्या वैयक्तिक कलानिर्मितीच्या प्रक्रियेचे रहस्य समजून घेतले. 'कथा सृजनाची' या पुस्तकात अशा तऱ्हेच्या विविध वाङ्मय प्रकार हाताळणाऱ्या दहा मान्यवर कलावंतांच्या मुलाखती संग्रहीत केल्या आहेत. साहित्यिकांच्या मुलाखती कारणपरत्वे स्फुट स्वरूपात पुष्कळ ठिकाणी प्रसिद्ध होतात; परंतु अशा प्रासंगिक मुलाखतीतून स्थिर स्वरूपाचे शास्त्रीय सिद्धांत हाती लागतीलच असे नाही. मुलाखतमाला प्रसिद्ध करून ती पुनश्च संग्रहीत करण्यामागे एक विशिष्ट दृष्टीकोन असावा तो म्हणजे आजच्या प्रथितयश साहित्यिकांच्या बदलत्या काळातून मनावर घडणाऱ्या संस्कारांच्या त्यांच्या साहित्यसृजनाच्या प्रक्रियेवरही नेमका परिणाम काय घडतो हे समजून घेणे हा एक आणि त्या त्या प्रत्येक साहित्यिकाच्या अधिक निकट जाता येऊन त्याचे स्वरूप न्याहाळण्याचा प्रयत्न करणे हा दुसरा. 'कथा सृजनाची' या संग्रहातील मुलाखती वाचल्यानंतर वरील दोन्ही दृष्टीकोन सफल होऊ शकतील असा विश्वास वाटतो. या दहा साहित्यिकांमध्ये विविध वाङ्मय प्रकार हाताळणारे आणि एखाददुसराच प्रकार हाताळणारे मधल्या पिढीतील साहित्यिक आहेत. कथाकार, पत्रकार व नाटककार भावे, नट, दिग्दर्शक नाटककार विनोदीलेखक पु. ल. देशपांडे, केवळ कथाच लिहिणारे अरविंद गोखले व वामन चोरघडे आहेत. नाटककार मो. ग. रांगणेकर, विभावरी शिरुरकर, कवि कुसुमाग्रज, (आणि नाटककार शिरवाडकर) वा. भ. बोरकर, प्रा. वसंत कानेटकर आणि श्री. ना. पेंडसे. ह्या सर्वांच्या मुलाखती घेताना सामान्यतः सर्वांना सारखेच प्रश्न विचारले आहेत. पण त्यांची उत्तरे मात्र प्रत्येकाने आपल्या स्वतंत्र शैलीने व प्रकृतीनुरूप दिली आहेत. तरीही त्यातून सर्वांच्या उत्तरात एक भाग समान वाटतो व तो निष्कर्ष म्हणून काढायलाही हरकत नाही. तो म्हणजे साहित्यात काल्पनिक असे काही येतच नाही. जे जे काल्पनिक वाटत असते ते ते सर्व लेखकाने एक वेगळे रूप देऊन मांडलेले वास्तवच असते. याचाच अर्थ असा की जीवनातील वास्तवाच्या भक्कम आधाराशिवाय कोणतीही वाङ्मयीन कलाकृती जन्म घेऊ शकणार नाही.

श्री. प्रभाकर अत्रे यांनी सामान्यतः प्रत्येकालाच एक एक प्रश्न या संदर्भात विचारलेला आहे आणि त्याची गोळाबेरीज वरील प्रमाणे होऊ शकते. दुसरे असे की, प्रत्येकाला विचारलेला ठराविक प्रश्न म्हणजे त्याच्या पहिल्या कलाकृतीविषयी आणि त्याच्या आवडत्या कलाकृतीविषयी. या प्रश्नांच्या उत्तरात प्रत्येकाने (अरविंद गोखले, चोरघडे यांचा अपवाद) आपण प्रथम काव्याला सुरुवात केली आणि नंतर त्या त्या वाङ्मयप्रकारात लिहू लागलो असे कबूल केले. पहिल्या कलाकृतीविषयीची प्रत्येकाची आताची प्रतिक्रियाही त्या ठिकाणी आपोआपच नोंदविली गेली आहे.

या सर्व मुलाखतींमध्ये एक पद्धतशीर नियोजन आहे, साक्षेप आहे याची जाणीव हा संग्रह वाचताना सतत जाणवते. कलावंतांच्या कलासृजनाच्या कथा वाचत असतानाच त्या सादर करणाऱ्या अत्र्यांच्या विषयीही एक प्रकारचे कुतुहल वाटू लागते. त्यांच्या साहित्याच्या प्रेमाबरोबरच साहित्याकडे पाहाण्याच्या त्यांच्या दृष्टीकोनाचीही जाणीव होते. आणि मग साहित्याबद्दल आस्था असणाऱ्या माणसात साहित्याविषयीचे एक वेगळेच प्रेम या संग्रहाच्या वाचनाने निर्माण होऊ शकेल असा विश्वास वाटू लागतो. साहित्याच्या निर्मितीला प्रतिसादाची किती अपेक्षा व आवश्यकता असते ते श्री. बोरकरांनी दिलेल्या उत्तरात जसे दिसते तसेच कुसुमाग्रजांनी दिलेल्या उत्तरामुळे आपण अंतर्मुख होऊन जीवनाचा सखोल विचार करू लागतो. साहित्यविचार आणि जीवन विचार यांच्या संयोगातून काही साहित्यविषयक मूल्येही अशा तऱ्हेच्या चर्चातून आपल्याला सहज मिळून जातात.

जाता जाता या पुस्तकाला लाभलेल्या प्रस्तावनेबद्दल. गुरुवर्य वि. स. खांडेकरांनी या प्रस्तावनेतून अत्र्यांना केवळ आशिर्वादाचे आणि प्रोत्साहनाचे चार

शब्द लिहिलेले नाहीत तर या मुलाखतीचे साहित्यातील कार्य सांगून त्या निमित्ताने आजच्या आघाडीच्या लेखकांनी मांडलेल्या विचारांचाही परामर्ष घेतला आहे. ही प्रस्तावनादेखील आपल्याला फार काही देऊन जाते.

तसेच अत्र्यांनी या संग्रहाच्या परिशिष्टातून दहाही कलावंतांची हस्ताक्षरे त्यांच्या स्वाक्षरीमकट दिलेली आहेत आणि त्या त्या कलावंताचा कर्तृत्वालेखही. या गोष्टींनी अभ्यासकालाही थोडीफार मदत होईल. विशेषतः हस्ताक्षराच्या निमित्ताने कविवर्य कुसुमाग्रजांनी टागोरांच्या कवितेचा केलेला उल्लेख मनोज्ञ वाटतो.

श्री. प्रभाकर अत्रे यांनी मुलाखतींचा संग्रह प्रसिद्ध करून प्रासंगिकाला चिरस्थायी स्वरूप देण्याचा केलेला प्रयत्न केवळ सुंदरच नव्हे तर उपयुक्तही आहे हे निःसंशय. या संग्रहात फक्त एकच उणीव भासली ती म्हणजे अग्रेसर लघुनिबंधकाराची.

प्रत्येकाच्या पुस्तकसंग्रहात हे पुस्तक म्हणजे एक मोलाची भर होईल !

**–श्रीहरि जोशी**

("कथा सृजनाची" मुलाखतकार–श्री. प्रभाकर अत्रे; सोमय्या पब्लिकेशन्स प्रा. लि. पृष्ठसंख्या–१५९)

## मंतरलेले वेट

मंतरलेले वेट हा मॅन्युअल कॉमरॉफ यांच्या 'बिग सिटी, लिटल बॉय' या पुस्तकाचा श्री. व्यंकटेश माडगूळकर यांनी केलेला अनुवाद होय.

न्यूयॉर्क शहरात जन्माला आलेल्या एका लहान मुलाचे जीवन निरनिराळ्या संस्कारातून कसे विकसित होते याचे दर्शन या पुस्तकात लेखकाने घडविले आहे. अमेरिकेतील १८९० ते १९०० या अंधश्रद्धेचा काळ, २० व्या शतकात झालेली यांत्रिक प्रगती; स्वातंत्र्यप्राप्तीचा काळ व या तिन्ही कालखंडात लेखकावर झालेले विविध संस्कार व बदलत्या परिस्थितीचा त्याच्यावर झालेला परिणाम आणि त्यामुळे त्याच्या अनुभवविश्वाला आलेली संपन्नता याचे चित्रण या पुस्तकात मॅन्युअल कॉमरॉफ यांनी केले आहे.

सर्वसाधारणपणे एकाच व्यक्तीला भिन्न काळातील विविध स्थित्यंतरे पाहण्याचे भाग्य लाभत नाही. कारण* त्या व्यक्तीचा जीवनपटच मुळी लहान असतो. प्रस्तुत लेखकाला हे भाग्य लाभले आहे. त्यामुळे एक कालविषयक जाणीव (Time Sense) त्याच्या लेखनात सतत दिसते.

भिन्न काळात आलेल्या जीवनानुभवांचे चित्रण करताना आणखी एक धोका संभवनीय असतो. भूतकाळाकडे एका विशिष्ट दृष्टीने पाहिल्यामुळे लेखनाला मर्यादा पडतात. मनाच्या पक्व अवस्थेतील काही विचार बालपणींच्या काळाकडे अलिप्तपणाने पाहू देत नाहीत. त्याचप्रमाणे आपण लेखक आहोत ही जाणीव दूर सारून लिहिणेही कठीण असते. बालपणी झालेले संस्कार, जसेच्या तसे टिपणे वाङमयीनदृष्ट्या वरच्या दर्जाचे ठरते. वर सांगितलेले सर्व धोके प्रस्तुत लेखकाने टाळले आहेत. मोठेपणीसुद्धा तो बालपणींच्या अनुभवविश्वाकडे त्याच निरागसतेने पाहतो. पुस्तकाच्या शेवटी लेखक म्हणतो–"आत्तापर्यंत सगळ्या गोष्टी सुटचा सुटचा आणि निरुपयोगी वाटत होत्या; पण मी लेखक व्हायचे ठरविले आणि वेडेवाकडे कापलेले तुकडे जुळविले. चित्रकोडे सुटावे तसे झाले. या फुटकळ गोष्टींना अर्थ प्राप्त झाला . . . हा अनुभव म्हणजे जीवनाने माझ्या पदरात टाकलेली मौल्यवान देणगी होय."

या लेखकाच्या लेखनात जितका सच्चेपणा आहे तितकीच विविधता व सूक्ष्मताही आहे. न्यूयॉर्क शहरातील निरनिराळ्या विभागाचे वर्णन, वृत्तपत्र कचेरी, दारूचे गुत्ते, मारामारी, स्वातंत्र्योत्सव, वसंत ऋतूचे वर्णन ही काही ठळक उदाहरणे म्हणून देता येतील. या निवेदनांतून लेखकाचे आजोबा, मिस्टर हॅंडले, ऑलीअरी बाई पियानिस्ट जोसेफी इत्यादींच्या व्यक्तिरेखा साकार झाल्या आहेत. याशिवाय मि. शिलर –एक चांभार व मि. कारवेट–एक सुतार यांची व्यक्तिचित्रे काही पात्रानच रेखीवपणे उभी केली आहेत.

थोडक्यात, 'मंतरलेले वेट' हे संमिश्र अशा विविध अनुभवांचे दर्शन घडविणारे चांगले पुस्तक आहे. आणि श्री. व्यंकटेश माडगूळकरांनी त्याचा अनुवादही तितकाच आकर्षक केला आहे.

**–विश्वनाथ शां. चौघुले**

( **मंतरलेले वेट** : लेखक–मॅन्युअल कॉमरॉफ; अनुवाद–श्री. व्यंकटेश माडगूळकर; प्रकाशक–मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई-४; किंमत तीन रुपये )

## कथा आकर्षक : कथामूल्य मात्र कमी

कमलाकर वारप या तरुण लेखकाच्या आठ कथा 'मुग्धा' या कथासंग्रहात समाविष्ट केल्या आहेत. या सर्व कथा वाचल्यावर सर्वात महत्त्वाची गोष्ट जाणवते ती ही की लेखकाला घटनात्मकतेचे वेड आहे. मराठी कथा आज बऱ्याच दिशांनी विस्तृत झाली आहे. आजची कथा कधी व्यक्तिचित्राचे रूप घेऊन आविष्कृत होते तर कधी एखादा तरल भावानुभाव व्यक्त करते. प्रस्तुत कथासंग्रहातील घटना कथांना अवास्तवतेचे रूप देतात. त्यामुळे एकदोन कथांचा अपवाद वगळल्यास इतर कथा सामान्य ठरतात. उदा : एका रात्री अपरिचित माणसाचा संबंध येणे व तिच्या विवाहासाठी खटपट करणे ('विधिलिखित') जगन ड्रायव्हरने मंत्र्याशी– तात्याजींशी अरेरावी करणे (सेवामूर्ति), कॉलेजचा वर्ग चालू असताना शांता

( पान ६१ वर )

(पान १८ वरून–**दहा लाखाची...**)

## दृश्य बारावे

( त्याच दिवशी साडेतीन पावणेचारचा सुमार. डॉ. शर्मा यांच्या फ्लॅटमध्ये डॉ. शर्मा, मधुकर दाते, मलकानी, हेमंत व्यास, आणि महेंद्र ठक्कर. )

डॉ. शर्मा हे मधुकर दाते. बँकेचे ऑफिसर. मुद्दाम यांना आणलंय्. जोखीम मोठी. म्हटलं इथंच मोजून घ्या रोकड.

मधुकर दाते नमस्ते.

हेमंत नमस्ते. मग उशीर का? मोजायला लागा ना. महेंद्रभाय्. पैसे काढा.

( महेंद्र ठक्कर सूटकेसमधून थैल्या बाहेर काढतो. थैलीतून नोटांची पुडकी काढतो. )

डॉ. शर्मा दातेसाहेब. घ्या मोजून. मलकानी तुम्हीही मदत करा.

( नोटांची मोजणी सुरू होते ).

मी पावत्या तयार करून ठेवल्या आहेत. आकडा तेवढा टाकायचा राहिला आहे. किती आहेत म्हणालात?

हेमंत नऊ लाख पस्तीस हजार.

डॉ. शर्मा ( पावतीवर आकडा लिहीत ) नाईन लॅक् थर्टी फाइव्ह थौझंड् ओन्ली. (सही करतो). हं. दातेसाहेब, जरा थांबा. या रिसिटवर तुम्ही आणि मलकानी दोघं सही करा पाहू.

(ते दोघे सह्या करतात) हं. चालू द्या तुमची मोजणी. हं व्यासशेठ ही घ्या पावती. हे डिलिव्हरी चलन.

(हेमंत दोन्ही कागद निरखून बघतो आणि खिशात ठेवून देतो.) हं काय? झाली मोजणी? बरोबर आहेत! किती झटकन् केली हो मोजणी. बाकी तुम्ही बँकेतले लोक अगदी एक्स्पर्ट असता नाही? मी मोजायला तब्बल तास घेतला असता. (हंसतो) बरं. चला आता.

हेमंत आता कुठे आणि कसं जायचं?

डॉ. शर्मा : आपण असं करू. मी आणि दातेसाहेब बँकेत जातो. थांबा हं. बँकेला अगोदर फोन करतो. नाहीतर वाट पाहून बँक बंद करायचे. (फोन करतो) हॅलो ऽ. युको बँक? कोण? मखिजानी ना? मघाशी तुम्हाला फोन केला होता तासापूर्वी. बँक उघडी ठेवताय् ना? पार्टी आलीय्. पैसे दिले आहेत. बँकेची वेळ संपली असली तरी अकौंट क्लोज् करू नका. पंधरावीस मिनिटात येतोच तिथे. (फोन ठेवतो) ...व्यासशेठ, मी आणि दातेसाहेब आमच्या गाडीतून बँकेत जातो. येथल्या वॉचमनलाही बरोबर घेतो. तुम्ही व मलकानी गोडाऊनकडे जा. मलकानी तुम्हाला डिलिव्हरी-देतील. डिलिव्हरी चलनवर सही करून तुम्ही मलकानींच्याकडे द्या. चला. उचला त्या पिशव्या.

हेमंत महेंद्रभाय् आपल्या दुकानाला फोन करा. दोन हमाल भायखळ्याला पाठवून द्या म्हणावं.

( महेंद्र ठक्कर फोन करतो. मग सगळे जिना उतरू लागतात. )

डॉ. शर्मा चला. All's Well that ends well. दोन महिने प्रदीर्घ चर्चा झाल्यानंतर शेवटी आज दिवस उजाडला.

हेमंत व्यापारामध्ये चालायचंच असं (दोघंही हंसतात)

( खाली डॉ. शर्मांच्या मोटारीत बसून डॉ. शर्मा, मधुकर दाते व एक वॉचमेन मिळून जातात. हेमंत व्यास यांच्या मोटारीत बसून. व्यास, ठक्कर व मलकानी मिळून जातात. )

## दृश्य तेरावे

( त्याच दिवशीची संध्याकाळ. पाच सव्वापाच वाजले आहेत. ससेक्स रोड भायखळा येथील गोडाऊन. गाडीतून मलकानी, हेमंत व्यास व ठक्कर उतरतात. )

मलकानी आज मी कुलूप उघडत नाही. ही किल्ली तुमच्या स्वाधीन करतो. कारण आता तुम्ही पूर्ण मालक झालात.

हेमंत (हंसतो). बरं बरं. द्या ती किल्ली. मीच कुलूपे उघडतो दोन्ही. (दोन्ही कुलुपे उघडतो) हमाल आलेत ना?

दोघे हमाल जी आम्ही आलोत शेठ.

हेमंत (सर्व पिंपे न्याहाळीत एकवार सभोंवती फिरून येतो) महेंद्रभाय्, एक लोखंडी पट्टी घ्या बघू कुठं पडलेली असेल तर.

ठक्कर ही घ्या.

( पट्टीच्या साहाय्याने एका पिंपाचे झांकण उघडतो. झांकण उघडताच त्याच्या चेहेऱ्यावर एकदम भांबावल्यासारखा भाव. दुसऱ्या एका पिंपाचे झांकण उघडतो. त्यावरोबर एकदम किंचाळतो ) मारा बाप ! मरी गयो... मरी गयो... फसी गयो.... अरे हे काय? गोणपाटाचे तुकडे आणि खडी? ( हा त्याचा अवतार पाहून मलकानी पळ काढण्याचा प्रयत्न करतो. त्याच्याकडे हेमंतचे लक्ष जाताच ) अरे अरे.. पकडा साल्याला. धरून ठेवा. साला चारसोवीस

( महेंद्र ठक्कर आणि हमाल मलकानी याला घट्ट धरून ठेवतात. हेमंत त्याच्याजवळ जातो आणि दोन थोबाडात देतो ) चारसोवीस! चोर. कुठाय रंग? कुठाय तो शर्मा? साला पळून जात होतास काय?

( महेंद्र आणि हमालही त्याला ठोसे लगावतात ).

मलकानी: (गयावया करीत) मला मारू नका. मला यातलं काहीच ठाऊक नाही. मी फक्त कस्टोडियन आहे हो. बाकीचा सगळा व्यवहार डॉ. शर्माचा. शप्पथ. खरंच मला यातलं काही माहीत नाही. ओय्... ओय्! मला मारू नका. खरंच सांगतो.

हेमंत (दातओठ खात ) कस्टोडियन काय? साला तुला पोलीस कस्टडीत नेतो चल.... महेंद्रभाय् दरवाजा लावून घ्या. आणि चला माझ्याबरोबर पोलीस स्टेशनला... दुकानातल्या कुणाला-तरी युनायटेड कमर्शियल बँकेत जायला सांगा... ( मलकानीची मानगूट पकडून सर्वजण मोटारीकडे जातात. )

**(क्रमशः)**

